विदर्भ साहित्यमाला पुष्प १ लें.

# लव्हाळीं

कवि

विष्णु भिकाजी कोलते

एम्. ए. एल्.एल्. बी.

प्रस्तावना लेखक

भवानीशंकर श्रीधर पंडित

एम्. ए.

अमरावती. ] किंमत १ रुपया. [ १९३३

# अनुक्रमणिका

परमपूज्य

दिवंगत जननीस

सादर समर्पण

## याच ग्रंथकर्त्यांचीं इतर पुस्तकें

१ नादब्रह्म ( खंडकाव्य )

२ उद्धवगीता. भास्करभट्टकृत

३ भास्कराचार्य महानुभाव
( चरित्र व काव्यविवेचन )

४ भाषाशास्त्राचा संक्षिप्त इतिहास

**लवकरच प्रसिद्ध होतील.**

# परिचायक प्रस्तावना

माझे स्नेही व एका काळचे सहाध्यायी प्रो. कोलते यांच्या कवितासंग्रहास मी परिचायक प्रस्तावना जोडावी अशी त्यांनी मला 'स्नेहभावाची आज्ञा' केली व मीहि ती मान्य केली, परंतु ती मान्य करतांना माझ्या मनाची चलबिचल झाल्याशिवाय राहिली नाही. 'गुळाचा गणपति व गुळाचाच नैवेद्य' असा तर हा प्रकार व्हावयाचा नाही ना अशी शंका मला आली. वास्तविक त्यांनी हा बहुमान माझ्यासारख्या सामान्य मनुष्यास न देतां एखाद्या अधिकारी व्यक्तीस बहाल केला असता तर अधिक शोभलें असतें. कारण, त्यांचा व माझा ऋणानुबंध फार जुना नसला तरी बराच प्रसिद्ध आहे; त्यामुळे त्यांच्याविषयी अनुकूल अभिप्राय पडल्यास कांही रसिकांकडून माझ्यावर पक्षपातित्वाचा व प्रतिकूल उद्गार निघाल्यास कांही जणांकडून माझ्यावर मात्सर्याचा आरोप होण्याची भीति आहे. शिवाय कित्येकांना हा प्रसंग 'अहोरूपमहोध्वनिः'च्या प्रकारापैकीहि वाटावयाचा ! परंतु प्रस्तुत संग्रहांत समाविष्ट केलेल्या बहुतेक सर्व कविता त्यांनी माझ्या सान्निध्यांत रचल्या असल्यामुळे, त्यांविषयी मला जसें मार्मिकतेने व निःपक्षपाताने लिहितां येईल तसें इतरांस लिहितां येणार नाही, असा

स्वतः प्रो० कोलते यांचा आग्रह पडल्यामुळे, व ही गोष्ट लक्ष्यांत घेतली असतां रसिकांचाहि गैरसमज होण्याचें कारण नाही, अशी माझी खात्री पटल्यामुळे, मी या कार्यास प्रवृत्त झालों आहें.

कोणत्याहि कवीच्या कवितेचें मर्म समजून घेण्यापूर्वी त्याच्या मनोरचनेचा अभ्यास करणें आवश्यक असतें. त्याची मनोरचना तो ज्या वातावरणांत वाढला व ज्या निरनिराळ्या परिस्थितींतून त्याला मार्ग काढावा लागला त्यांवर अवलंबून असते. बदलत्या ऋतुमानाचा पाषाणासारख्या कठोर पदार्थावरहि चिरकालिक परिणाम झाल्याखेरीज रहात नाही, मग तो कलाकाराच्या हळुवार हृदयावर घडल्यास नवल तें काय ? त्याचा स्वभाव, त्याच्या आवडीनिवडी, त्याचें शिक्षण व अध्ययन, त्याचे आवडते ग्रंथ, त्याच्या अंतःकरणावर घडलेले संस्कार इत्यादि अनेक गोष्टींचें सूक्ष्म निरीक्षण केल्याशिवाय त्याच्या कृतीशीं रसज्ञाला समरस होता येत नाही. कलावंताची कृति अशी आहे व ती अशी असावयास हवी होती असें सांगण्यापेक्षा ती कशी आहे ? व ती तशी कां ?— हें कथन करण्यांतच विवेचकाचें कौशल्य आहे. या दृष्टीने प्रो० कोलते यांच्या जीवनाकडे पाहिल्यास त्यांच्या कवितेच्या वेशाचा उलगडा सहज होईल.

कोलते यांचा शैशवकाल पश्चिमवऱ्हाड व पूर्वखानदेश यांच्या सीमासंगमावर वसलेल्या नरवेल व कोथळी या दोन खेड्यांच्या मोकळ्या हवेंत व्यतीत झाला आहे. या दोन स्थळीं अनुभवलेल्या सृष्टिसौंदर्याच्या नाजुक छटा त्यांच्या कांही वृटित प्रकरणांत प्रतिबिंबित झाल्या आहेत. त्यांचा जन्म एका मराठा कुळांत झालेला, व त्या कुळाकडे परंपरागत

वऱ्हाडांतील एका खास गांवाची पाटिलकी चालत आलेली, यामुळे एका विशिष्ट प्रांतिक बोलीशीं त्यांची जन्मतांच ओळख आहे—नव्हे, तिच्यावर त्यांचा हक्क आहे. या बोलीवर बाह्य जगांतील घडामोडींचे परिणाम फारच थोड्या प्रमाणांत झाले असल्यामुळे ती नागर भाषेप्रमाणे दूषित (—हवी तर सुसंस्कृत म्हणा—) झालेली नाही. या बोलींतील कांही विवक्षित, अर्थपूर्ण, कोमल व सुटसुटित शब्दांची योजना त्यांनी आपल्या कांही कवितांत केली आहे. 'विविधज्ञानविस्तारां'त क्रमशः प्रसिद्ध झालेली 'पश्चिम वऱ्हाडांतील कांही प्रचालित शब्द' ही त्यांची लेखमाला पुष्कळांच्या स्मरणांत असेल. अनेक भाषापंडितांनी आपल्या लिखाणांत तिचा उपयोग करून घेतला आहे. अशा प्रकारें कोलते यांनी आपल्या ज्ञानाचा लाभ इतरांस देऊन अप्रत्यक्षरीत्या भाषेच्या अभिवृद्धीस हातभार लावला आहे. आपलें हें भाषाविषयक ज्ञान सध्या ते महानुभावांच्या ग्रंथांचें परिशीलन करण्यांत खर्च करीत आहेत.

त्यांचें प्राथमिक शिक्षण मलकापुरास व दुय्यम (—प्रवेश परीक्षेपर्यंतचें—) शिक्षण खामगांवास झालें आहे. खामगांवास असतांनाच त्यांच्या प्रतिभेचा उन्मेष झाला. त्या वेळीं तेथील सरकारी पाठशाळेचे मुख्याध्यापक रावसाहेब गोरे हे होते. 'अलंकारचंद्रिका' व 'काव्यदोष-दीपिका' हे दोन ग्रंथ रावसाहेबांच्या अगाध काव्यव्यासंगाचे निदर्शक आहेत. त्यांच्या उत्तेजनाने महाविद्यालयांत पदार्पण करण्यापूर्वीच कोलते यांनी संस्कृत वाङ्मयांतील आभिजात वागीश्वरांच्या ललितालि-खितांचा अभ्यास करण्यास आरंभ केला होता. यांचें दृश्यफल ते पुढे विद्यालयीन विद्यार्थी बनल्यावर कलकत्ता विद्यापीठाच्या 'तीर्थ' या उपाधीच्या प्रथमा व मध्यमा या दोन्ही परीक्षा यशस्वी रीतीने उत्तीर्ण

झाले, त्यावेळीं दिसून आलें. प्रकृत पुस्तकांत आरंभींच घातलेली ' भिक्षान्देहि ' ही त्यांची एक गीर्वाण कविता व सुरवातीच्या कवितांचा संस्कृतप्रचुर घाट, या सत्याची साक्ष देण्यास समर्थ आहेत.

१९२५ सालीं प्रवेशपरीक्षा पसार झाल्यावर ते आगामी शिक्षणासाठी येथील मॉरिस कॉलेजांत प्रविष्ट झाले. याच सुमारास त्यांचा व माझा परिचय झाला. समवयस्क, समव्यसनी व सहपाठी ह्मणून लवकरच आमच्या परिचयाचें रूपांतर सांद्र स्नेहसंबंधांत झालें. त्यांनी व मीं सहा वर्षें एकमेकांच्या साहचर्यांत काढली. या अवधींत आह्मीं दोघांनी मिळून बराच वेळ काव्यशास्त्रविनोदांत घालविला. कोलते यांनी बहुतेक सर्व कविता याच काळांत लिहिल्या आहेत. १९३१ साली ते एम्. ए. एल् एल्. बी. झाले, व लगेच त्यांस उमरावती येथील किंग एडवर्ड कॉलेजांत मराठी विषयाच्या अध्यापकाची जागा मिळाली. आज दोन वर्षें ते तेथेच अध्ययनाचें व अध्यापनाचें कार्य करीत आहेत. मात्र, अलिकडे त्यांचें लक्ष्य गद्य-लेखनाकडे विशेष वेधलें असल्यामुळे, त्यांच्या हातून फारच तुरळक काव्यरचना होत असते.

परंतु त्यांची काव्यनिर्मिती अलिकडेच खंडित झाली आहे असें नाही. ती पूर्वीपासूनच विविध व विपुल नाही. याला कारण त्यांचा बुद्धिप्रधान स्वभाव असावा. कोणताहि प्रसंग पहातांच त्याने हलण्या-इतकें त्याचें हृदय हळुवार खास आहे; परंतु त्यांत उद्भूत झालेली भावना शब्दरूपाने बाहेर पडते न पडते तोंच तिचें पृथक्करण करण्या-इतपत त्यांची बुद्धि तीव्र आहे. त्यामुळे भावनेला पहिल्या उसळी-

बरोबरच पुन्हा उगमांत ठाव घ्यावा लागतो. बुद्धिप्रधान स्वभाव तर्ककर्कश असतो. त्यामुळे त्याला कल्पनेचेंहि वावडें असतें. मात्र, आपल्या कृतींत वाचित्र्य आणण्याचा प्रयत्न करून कोलते यांनीं हा वचपा भरून काढला आहे. एखाद्या टुमदार बंगलीच्या मर्यादित आवारांत लहानगी फुलवाडी असावी. आणि तिच्यांत तऱ्हतऱ्हेचीं असंख्य फुलझाडें असण्यापेक्षा कांही विवाक्षित जातींचीं थोडकींच, परंतु वेगवेगळ्या रंगाचीं फुलझाडें मोठ्या चातुर्यानें लावलेलीं असावींत, तसा त्यांच्या कवितासंग्रहाचा देखावा आहे. ठराविक मर्यादेंत फुलांची पैदास करणें कष्टप्रद असतें. त्याला फुलारी कलाकुशल असावा लागतो. वेंचकच फुलरोपडीं, परंतु कलमा कापून त्यांचे चित्रविचित्र भेद निर्माण करण्याकडे त्याला आपलें बुद्धिसर्वस्व वेंचावें लागतें. तीं लोकांच्या नजरेंत ठळकपणें भरतील अशी त्यांची उठावदार लावण त्याला करावी लागते. तीव्र बुद्धिमत्तेच्या जोडीसच कोलते यांच्या अंगीं अविश्रांत कष्टाळूपणा मुरला असल्यामुळे त्यांच्या या चिमुकल्या संग्रहांत रचनेचें वैचित्र्य दृष्टीस पडतें. छंदशास्त्रांतील बहुतेक सर्व नामांकित वृत्तें त्यांनी हाताळलीं आहेत. विषयानुरूप वृत्ताची योजना करण्यांत व रसानुकूल शब्दांची मांडणी करण्यांत त्यांचें बेमालूम कसब उघड झालें आहे. हल्लीं गेय चालींची सद्दी आहे. कोलते यांनीहि कांही भावगीतिका चालीवर रचल्या आहेत; परंतु त्यांची प्रतिभा वैणिक नसल्यामुळे, त्या उतराव्या तेवढ्या सरस उतरलेल्या नाहीत. मात्र, वृत्तरचना व शब्दयोजना या दोन्हीहि बाबतींत त्यांची कृति निव्वळ निर्दोषच नाही, तर नितांत रमणीय आहे.

प्रस्तुत पुस्तकांत प्रो० कोलते यांनी आपल्या कविता कालानुक्रमाने छापल्या असल्यामुळे कवीच्या मनाचा विकास पायरी पायरीने कसकसा होत गेला हें कळणें सुलभ झालें आहे. त्यांच्या एकंदर कवितासंग्रहाचें विहंगमावलोकन केल्यास स्थूलमानाने त्याचे तीन प्रमुख भाग पडतात. त्यांच्या सुरवातीच्या कविता संस्कृतप्रचुर आहेत. हा त्यांनी संस्कृत साहित्यिकांच्या कृतींचा सतत व्यासंग ठेवला त्याचाच परिणाम आहे. काव्यनाटकांच्या बरोबरीला त्यांनी छन्द, व्याकरण व अलंकार या शास्त्रांचाहि भरपूर परामर्श घेतला असल्याचें स्पष्ट दिसतें. बालपणीं मनाचा ओढा अर्थालंकारांपेक्षा शब्दालंकाराकडे अधिक असतो. त्या वयाच्या तरल वृत्तीला अर्थगांभिर्यापेक्षा पदलालित्यांतच विशेष मौज वाटते. याचें कारण, तें वय अतिरंजनाचें असतें. कोलते यांच्या प्रारंभिक कवितांत अनुप्रास, श्लेष व यमक यांचीं उदाहरणें मनस्वी सांपडतील. त्यांनी कविसमयांचा विनियोगहि सढळ हाताने केला आहे. आधुनिक काव्यवाचकाला अलंकारांच्या भाराने भारलेली ही कवितावधु रुचणार नाही, व ती घेत असलेल्या अवास्तव सवलतीहि त्यास पचणार नाहीत. आपल्या 'करुणासप्तकां'-त त्यांनी साधलेले 'मध्ययमक' पाहिलें म्हणजे वामन पंडित व मोरोपंत या पूर्वसूरींच्या कवितावनिता लाजतील असें वाटतें. विद्यमान जुन्या कवींत रा. चंद्रशेखर व रा. तिवारी यांच्या कवितांची अशी धाटणी आहे. तरुण पिढींत एकमेव कोलतेच अशा धर्तीवर लिहिणारे दिसतात. येवढ्या लहान वयांत अशी कठिणरचना करणें केव्हाहि कौतुकास्पदच आहे. मात्र, कित्येक स्थळीं वरट, वल्लिका प्रसवीते इत्यादि अपरिचित शब्द पडल्यामुळे कविता वाचतांना विरस होतो.

पांडित्याचा प्रकर्ष दर्शविणाऱ्या जुन्या वळणाच्या या कवितांमधून तिला शोभेल अशी कोलत्यांची भाविकताहि प्रकट झाली आहे. या समयाच्या त्यांच्या कविता पुरातन पद्धतीच्या असल्या तरी,

पाहोनि मंदपवनोत्थित तत्तरंगा
वाटे जणूं युवति या निज अंगभंगा
प्रेमें करोनि रमती स्थलिं याच; कां हें ?
चांचल्य हा युवतिचा गुणधर्म आहे

अशांपैकी एखादी हृद्य कल्पना व तिच्यावर आधारलेला जागतिक अनुभवाचा एखादा अर्थांतरन्यास मनाला मोहनी घालण्यास चुकत नाही.

या पुढील त्यांच्या कविता साध्या पण मनोरम आहेत. महाविद्यालयांत प्रवेश करतांच आभिजात आंग्ल वागीशांच्या काव्यांच्या परिशीलनाने व रसिकावलोकनाने त्यांचा जुना दृष्टिकोण बदलला. याला थोडें फार प्रचलित मराठी कवितेचें वाचन व राष्ट्रभाषा हिंदीचें पठनाहि कारणीभूत झालें. शिवाय, वाढत्या वयाबरोबर आपण ज्या काळांत राहतों आहों त्याची जाणीव होऊन त्यांच्या दृष्टीचें क्षितिज व्यापक बनलें. त्यांच्या यापूर्वीच्या धोपटमार्गी स्फूर्तीला नवीन नवीन वर्ण्यविषय लाभले. त्यांची ‘अभागी शेतकऱ्याचे उद्गार’ ही कविता कसलेल्या लेखणींतून निघालेली नाही; परंतु

क्षेत्रीं धान्यें डुलत असतां मंद मंदानिलानें
भावी सौख्या तरलनयनें पाहिलें मी सुखानें
आनंदानें रमणिसह ज्या त्या स्थलीं गोष्टि केल्या
दुर्दैवानें स्मृतिविषय त्या सर्वही आज झाल्या !

या पंक्तींत ओतलेली भावमधुरता हृदयाचा ठाव घेते. ' संगमोत्सुक, ' ' मुक्ताबाईच्या समाधीपाशीं, ' ' महाश्वेतेची दिनचर्या ' इत्यादि त्यांच्या कविता प्रतिभेच्या परिणतप्रज्ञतेची ग्वाही देण्यास पुऱ्या होतील. त्यांनी आपले दिवंगत मित्र दामोदरपंत पाटील यांच्या स्मृतीस अनुलक्षून जीं प्रकरणें रचलीं आहेत तींहि निःसीम हृदयस्पर्शी व करुण उतरलीं आहेत. यापुढे स्वभावोक्ति हाच एक त्यांच्या आवडीचा अलंकार झालेला दिसतो. क्वचित्

छायां पाहत आपुलीच विरतों मातीपरी या जलीं; अथवा

रस्त्यांतून समस्त संथ दिवल्या आशेपरी जागती

अशा सर्वस्वी अभिनव व हृदयंगम उपमांचा उपयोग त्यांनी केला आहे. यासुमाराचें त्यांचें रचनाचातुर्यहि स्पृहणीय आहे.

तिसऱ्या व शेवटच्या भागांत त्यांच्या विवक्षित प्रकारच्या कवितांचा समावेश होतो. या वेळीं त्यांचा भाषाशास्त्राचा अभ्यास चालला होता. तेव्हां साहजिकच त्याचा प्रतिध्वनि त्यांच्या कविताकृतींत उमटला आहे. ते एका विशिष्ट प्रांतिक बोलीचे वारसदार आहेत तिच्या शब्दाचा प्रसार व्हावा म्हणून त्यांनी ग्रामीणगीतें लिहिण्यास सुरवात केली. त्यांत ' ही कोण ? ' हें गीत उत्कृष्ट आहे. बाकीचीं गीतें साधारणच आहेत. शब्दांसाठी गीतें तयार करण्यांत आल्यामुळे, व कवी जन्मजात ग्रामीण असला तरी त्याचें मन नागर बनल्यामुळे या गीतांत स्वाभाविक जिव्हाळा वाटत नाहीं. तीं नीरस एवं कृत्रिम भासतात. परंतु, असें असून सुद्धा याच बोलींत लिहिलेलीं त्यांचीं वत्सलगीतें अत्यंत सरस व सहजसुंदर उतरलीं आहेत. किंबहुना त्यांच्यामुळेच कोलते यांचें नांव कवि या नात्यानें विशेष प्रसिद्धि पावलें

आहे. याचें मूळ त्यांच्या वत्सलवृत्तींत आहे. बालगोपालाच्या नाजुक व चंचल वृत्तींशीं ते तत्काळ तद्रूप होतात. स्वतःच्या कनिष्ठ सहोदरेवर त्यांची उत्कट व अनन्य ममता आहे. तिला एकटीला उद्देशून त्यांनी तीन कवनें लिहिलीं आहेत, व तिन्हीहि मृदुमधुर भावनांनी उंचबळलेलीं आहेत. विशेषतः

कुणी म्हणती शशिकोर नभीं आली
परी खोटी ही असे सर्व बोली
कोर नच, विलसते व्योमभागीं
अंगुलीचें नख इच्या धवलरंगी
शानु अमुची मंजुषा सद्गुणांची
बालप्रतिमा निज मातृदेवतेची
म्हणुनिया हे गुंतले असति ताई !
पांचही माझे प्राण तुझ्या पायीं

या ओळींत त्यांनी तिचें जें वर्णन केलें आहे तें, ज्यांनी तिला व कोलते यांच्या स्वर्गवासी जननीला प्रत्यक्ष पाहिलें आहे, त्यांना अतिशय समर्पक वाटल्यावांचून राहणार नाही. मातेवरील त्यांच्या कवितांनाहि या संग्रहांत स्थान मिळालें आहे. त्यांवरून त्यांची मातेवरील अढळ निष्ठा व्यक्त होते. त्यांची 'गालबोट' ही ओवी ऐकून कोणीहि मनुष्य मान डोलवेल. तिच्यांत गर्भित असलेला वत्सलभाव, त्याच्या जोडीस लाभलेली रसानुकूल जाति, सहज सुचलेल्या कोमल कल्पना, न कळत पडलेल्या उचित उपमा व आपोआप निघालेले निवडक पण अर्थपूर्ण शब्द, यांनी तिला चिरकालिक तजेला व टवटवी प्राप्त झाली आहे. नमुन्यादाखल पुढील एक कडवें पहाः—

सर्व्या जगाचं कौतुक
इच्या झांकल्या मुठींत
कुठें ठेवुं ही साळुंकी ? —
माझ्या डोळ्याच्या पिंज्ऱ्यांत.

त्याच प्रमाणे 'अंगाई' मधील

डंवरले काहून ग !
लाल गुलाब हे दोन्ही ?

अथवा

हासतील ओंठावर
मग कशा जाई जुई ?

हे काव्यात्मक उद्गार लक्ष्य वेधणारे आहेत. या सर्व वत्सलगीतांत त्यांची 'आटपाट नगरांत' ही कविता उत्कृष्ट आहे. प्रतिभेची प्रसन्नशक्ति, स्फूर्तीची स्वाभाविकता, कल्पनेची भरारी, भावनेची उत्कटता, भाषेची मधुरिमा व रचनेची प्रदीर्घता या ठळक काव्यगुणांचा एकसमयावच्छेदेंकरून झालेला हृदयंगम संगम तिच्यांत गोचर होतो. मोर आभाळ येतांच पिसारा उभारून टाहो फोडीत नाचूं लागतो; तो कां ? '–या सर्वसामान्य लोकांच्या पाहण्यांत असलेल्या दृश्यावर त्यांच्या कल्पनेची उभारणी झाली आहे. बालमनाला सुरस व चमत्कारिक कथा अतिशय रंजवितात, हें सत्य कवीनें आपल्या दृष्टिआड केलेलें नाही. आटपाट नगरांत मैनाई नांवाची राणी होती. तिला साळुंकी नांवाची एकुलती एक लेक होती. कवीने तिच्या शृंगाराचें वर्णन केलें आहे.

तिला राहाया छानसा
खोपा सुग्रणीनं केला
एका आंब्याच्या डांगीला
तिचा बांधला झिकोला
रुपे अंगाला तियेच्या
मउ रुवाचा गालीचा
पांघराया पलंपोस
अरणींच्या पाकळ्यांचा
झोप जेव्हां घेई बाळी
वारा विंझणा पालवी
कोणी पाय चुरी कोणी
टाकी अंगीं शाल नवी

पुढे ती वयांत आली. देशोदेशींच्या राजांनी तिला मागणी घातली. परंतु सावित्री प्रमाणे सर्व पृथ्वी पालथी घालून तिने राघोची आपला पति ह्मणून निवड केली.

रूपें नोवरा देखणा
मोठ्या टेकीनं तो चाले
डोळे पाणीदार, ओंठ
जसें भेंदरें पिकलें

नवरदेवाचें हें हुबेहुब वर्णन—विशेषतः, त्याच्या चोंचीला दिलेली सार्थ उपमा बालरसिकांनाच काय, परंतु प्रौढ वाचकांनाहि गुदगुल्या केल्याशिवाय राहणार नाही. परंतु ऐन घटकेस लग्नाचा विरस होण्याचीं चिन्हें दिसूं लागलीं. नवरीचा तोंडवळा सोनचाफ्याच्या फुलाप्रमाणे पिवळा तकतकीत होता; परंतु ती अव्यंग नव्हती. एका खोडीगार्यी तिच्या रूपाचें मातेरें झालें होतें.

पाय तिचे काळेकुट्ट
जसें लव्याचें ओंगण
यतां ध्यानांत राघाच्या
उतरलं त्याचं मन

मग काय विचारतां ? नवरीच्या उरांत धाक भरला. ती रातोरात आपल्या मोरूदादाच्या घरीं गेली व त्याच्या मनांत साखर पेरून एका पंधरवड्यासाठी त्याचे पांय उसने घेऊन आली. झालें. भोळ्या दादाला आपल्या या लबाड ताईचा कावा उमगला नाही. त्याने पुष्कळ वर्षे तिची परतण्याची वाट पाहिली. आणि मग मात्र

क्षण पायाकडे पाहे
पाहे क्षण नभाकडे
काळे पाय दिसतांच
येतें डोळ्यांमध्यें रडें

अशी त्याची स्थिति झाली. अशा प्रकारें तो रडतो का ?—या प्रश्नाचं चमत्कारिक उत्तर कवीने दिलें आहे. विषयाला साजेल अशी रसोत्कर्षक चाल, सर्वांना सहज समजेल अशी सरल व सरस भाषा, थोड्या शब्दांत पुष्कळ अर्थ व्यक्त करतील असे सुटसुटित वाक्प्रचार, अधून मधून सत्याचा आभास उत्पन्न करण्याकरिता दिलेले पौराणिक कथांचे संदर्भ आणि अवधान आकर्षून घेईल असें कथनकौशल्य, यामुळे ही कविता ' प्रतिक्षणिं नवीच दे रुचि '—अशा तोडीची झाली आहे. या कवितेत कोलत्यांची कवित्वशक्ति परमोच्च बिंदूला पोचली आहे.

येथपर्यंत कवीचें जीवन चरित्र, मनोरचना व तिच्या अनुषंगाने झालेला लेखनकलेचा विकास, यांसंबंधीं प्रपंच झाला. लिहिण्याच्या ओघांत मला जीं चित्ताकर्षक स्थळें वाटलीं त्यांच्या विषयीहि मी

विचार केला. आतां काव्यांतील गुणदोषांबद्दल थोडेसें विवेचन करतों.

' कौलते यांच्या कवितेचा संसारक्षमता हा एक मोठा गुण आहे. ती अर्ध्या हळकुंडानें पिवळी झालेली नाही. तिच्यावर त्यांच्या वाचनाचे व निरीक्षणाचे ठसे उमटले आहेत.

दुर्दैवानें स्मृतिविषय त्या सर्वही आज झाल्या

हा चरण वाचतांच जगन्नाथ पंडितांच्या कृतीचें व,

उत्संगस्था मलिनवसना

हा चरणार्ध पहातांच कविकुलगुरूंच्या ' मेघदूतां'चें स्मरण सहज होतें.

माध्यान्हीं तीं तरणिकिरणें तापतांना वरून

इत्यादि पंक्ति बाबू मैथिलीशरण गुप्त यांच्या ' भारतभारती ' मधील ' किसान ' या प्रकरणावरून सुचलेल्या वाटतात, तर

होता शिवाजी न, जाती तरीं मातृभूमी अविंधांचिया बंधनी

शेंडी शिरीं राहती ना मुळीं, भ्रष्ट होत्या सदा हिंदुच्या नंदिना

हें पादयुग्मक भूषण भाटाच्या ' शिवाबावनी ' मधील एका घनाक्षरीचा अनुवाद वाटते. त्यांचे ' स्मृतितरंग ' विचारशैलीत टेनिसन्‌च्या ' इन् मेमोरियम् ' मधील कांही विभागांची व भाषाशैलींत रा. माधव-ज्यूलियन् यांच्या ' विरहतरंगा ' ची आवृत्ति भासतात, तर ' आशेस ' ही आर्या—

Hope ! of ills that men endure
Thou art the cheapest and univereal cure

इ० इंग्रजी काव्यपंक्तींशीं समानार्थक दिसतात.

झालें गेलें तया दाखवी खोल विस्मृतीदरी ; किंवा

दुर्दैवें परि हाय ! हाय !! अपुल्यामध्यें नद्या घातल्या

हे चरण A gulf lies between us या आंग्लभाषासंप्रदायाची

चट्कन् आठवण देतात तर, ' गुराखोनी ' हें नामसाधित धातुरूप the wind came and shephered the clouds या वाक्याकडे स्मृतीला ओढून नेते. वाक्प्रचार राहोत, पण प्रसंगीं पाश्चात्य कविसंकेतांचाहि त्यांनी उपयोग करून घेतला आहे. ' भक्ती'वर ' अंशुकाचें ' रूपक करतांना त्यांनी त्याचा रंग हिरवा कल्पिला आहे. यावेळीं,

Red is the colour of love and youth
Green is the colour of faith and truth

या चरणयुग्मांतील समजुतीचें सहाय्य त्यांनी घेतलें असावें.

त्यांची कविता जशी सुसंस्कृत तशी शुद्धहि आहे. ती केळीच्या गाभ्याप्रमाणें कोमल नसेल, परंतु, अग्निस्फुलिंगाप्रमाणे पवित्र आहे. शुद्धतेच्या बरोबरीलाच त्यांचें प्रसाधनकार्यहि प्रशंसनीय आहे. तें सिद्ध करण्यासाठी

जगतीं तुझीच आशा, तुजविण कोणी मुळीं न मज आशे !
झाली पूर्ण निराशा इतरत्रहि बद्ध जी करी पाशें

अथवा,

एकांतांत बसोनिया शशिकले ! चित्रें तुझीं चित्रिलीं
अर्धोन्मीलितनेत्रपद्मयुगुलीं त्वन्मूर्ति आराधिली

किंवा

मोत्यांचीं भरघोस शुभ्र कणसें बांधोनि नीलांचलीं
निद्रामाउलि वावरांत डुलत्या धान्यावरी पेंगली
गांवामाजि परंतु रात्रभरही जागोनि सारे जन
उत्साहें सुमहोत्सवांत करिती दीपावलीचा सण

येवढे उतारे उद्धृत केल्यास पुरे पडतील.

एका खास प्रादेशिक भाषेंतील अर्थवाहक शब्दांची सक्रिय उपयोजना हा एक त्यांच्या कवितेचा वैशिष्ट्यदर्शक गुण विशेष उल्लेख-

नीय आहे. या अस्सल मराठी शब्दांची सुशिक्षित नागरिकांकडून अवहेलना होत असते. या अनुदार उपेक्षेमुळे कित्येक प्रसंगीं परकी शब्द या जातिवंत रहिवाश्यांवर कुरघोडी करतात, व परावलंबी नागरिकांना आपलें दास्य करावयास भाग पाडतात. या दृष्टीने वावर, शेव, वजेवजे, ताव, झिकोला, खोडी, झांक, पांगोरा आदि शब्द चिंतनीय आहेत. त्यांच्या जीर्णोद्धाराचें निर्भेळ श्रेय कोलते यांनाच आहे.

' उपर्युक्त गुणांच्या प्रमाणांत दोष मात्र 'दरियामें खसखस' ह्मणीप्रमाणे अत्यंत अल्प भरतील. कित्येक वेळां, शद्बांची काटकसर न करतां एकच कल्पना चौथ्या चरणापर्यंत ताणण्यांत आली आहे. कांही ठिकाणीं एकाच वाक्यप्रयोगाची त्रासदायक पुनरुक्ति झाली आहे; आणि क्वचित् अनुचित, कर्णकटु अतएव दुष्ट शद्बांची योजना झाली आहे.

सुदैवाने कोलते यांस साहित्यिकाच्या प्रकृतीस मानवेल व कीर्तीस साजेल असाच व्यावसायिक अधिकार प्राप्त झाला आहे, ते त्याचा योग्य सदुपयोग करीत आहेत हें त्यांस केव्हांहि भूषणावह आहे. त्यांनी नुकतेंच 'नादब्रह्म' नांवाचें एक प्रदीर्घ काव्य रचावयास घेतलें आहे. महाराष्ट्रशारदोपासकांना त्यांची ही संकल्पित ललितकृति सध्या समोर असलेल्या कृतिपेक्षा शतपटीने रिझवो अशी हार्दिक व प्रामाणिक इच्छा व्यक्त करून मी आपली कंटाळवाणी लेखणी बाजूस ठेवितों.

धनतोली,
नागपूर. ( मध्यप्रांत. )
शनिवार; एप्रिल. २२. १९३३.

**भवानीशंकर श्री० पंडित.**

# भिक्षान्देहि

त्वदीयकरपङ्कजस्थवरवल्लकीनिक्कणो—
लुसध्दृदयमागतं किमपि याचितुं चत्वरे
त्वमेव ननु माममन्दमधुरामृतस्राविणा
तडित्तरलवीक्षणेन सदये ! कृतार्थं कुरु

तवामलिनमानसे विकचकाव्यपद्माशिनः
कवीन्द्रकलहंसकास्तु विहरन्ति नित्यं सुखम्
न तत्र किमपि स्थलं ! कथमपि प्रियं मे कुरु
निवर्तयितुमम्ब नार्हसि गृहागतं याचकम्

यदा नु श्रुतमस्ति मद्विधजनेन यत्पाप्मनां
त्वमेव शरणं सदारुणितलोचने शारदे !
तदायमभवज्जनस्तवपदाम्बुजस्थः स्वयं
मरन्दमधुरस्वनाविरतमञ्जुगुञ्जन्नलिः

अयि त्वमसि चन्द्रिकामलमनाश्चकोरोऽस्त्ययं
तृषाकुलितचातकस्त्वमसि मुग्धकादम्बिनी
किमत्र नवरूपकैर्हृदयमेव मे त्वत्करे
जनत्रयशुभंकरे त्वरितमद्यमामुध्दर

# १ आवाहन

( केशवकरणी )

१

ऊट काव्यकल्पने! प्रेमले! निद्रा झाली पुरी
ऊठ गे ऊठ अतां झडकरी
रविकिरणांचें मंडळ आलें पहा उंच अंबरीं
प्रभा निज फेंकित अवनीवरी
विहंगमांचा वृंद चिव्‌चिवे पिंपळपानांतरीं
मोहिनी घालित रसिकावरी
आनंदगीत चंडोल सुखें गातसे
हा राघू पोपटपंचि मधुनि करितसे
गुंजतो नवल चंपकीं भृंग सौरसें
काव्यदेवता शारदाश्रमीं वीणावादन करी
दाखवी जगा कवनमाधुरी

२

दुर्गादेवालयीं तियेचा दास चौघड्यावरी
चंडिकाशतक गात सुस्वरीं
गोदागौरव गात चालला वीणा घेउनि करीं
कुणी द्विज शशिशेखरमंदिरीं
विरहतप्त कवि कुणी ठेवुनी स्मरणीं हृदयावरी
प्रियेचें ध्यान निरंतर करी
पूर्वेस नभःश्री पंडितमन डोलवी
उन्मनस्क कुसुमाकरां अनिल हांसवी
झेंडुचें फूल परि छवी दाखवी नवी
द्विजसम्राट् केव्हांपुन आला भास्कर क्षितिजावरी
स्वर्णकण उधळित नीलांबरीं

३

सृष्टिसतीचे भाट सर्व हे जागे झाले तरी
तुझी नच निद्रा झाली पुरी
मंगलसमयीं अशा तूंच निस्तब्ध कशी सुंदरी!
मौन तव विव्हल मन्मन करी
फार दिवस जाहले तुला मी उपेक्षिलें अंतरीं
म्हणुनि कां रुष्ट होसि मजवरि?
तरि दासावरि या अतां सदय होउनी
दे उदारहृदये! कोप सर्व सोडुनी
मी अनन्यभावें शरण तुला मानिनी!
झालें गेलें तया दाखवी खोल विस्मृती-दरीं
पुन्हां न स्मरण तयाचें करी

४

वदनावरि तव झळकूं दे स्मित सोड उदासीनता
कशाला करिशि काळजी वृथा
रसिकंमन्यें अपमानिलि जरि तुझी स्वयंचारुता
घेशि कां मनास लावुनि स्वता
महाकवि श्रीभवभूतीचें वचन स्मर तत्वतां
येउ दे अंगीं तव धीरता
जरि खरोखरी असशील सखे! साजिरी
आबाळ कोणि ना करील तव सुंदरी!
ठेवितील तुज सर्वदा स्वरसनेवरी
परी न जरि अंतरीं लवभरी तुझ्या खरी योग्यता
तरी तव जनन व्यर्थ सर्वथा

५

सुधास्त्रावि चंद्रिका किती जरि चोरांनीं निंदिली
रसज्ञां अप्रिय कां जाहली?
ज्ञानपातकारिणी वारुणी मूर्खें आलिंगिली
गुणज्ञें परि ती अव्हेरिली
सुसेव्य जरि असशील तरी होशील मान्य भूतलीं
व्यर्थ कां पडशी चिंतानलीं?
एकही जरी समहृदयी तुज भेटला
तव अंतरंगदर्शनें मनीं तोषला
पळभरी दुःख निज तुझ्यामुळें विसरला
समजेन तरी प्रयत्नवल्ली फलसंयुत जाहली
लेखणी सार्थकता पावली

## २ करुणा सप्तक

( द्रुतविलंबित )

१

नमन हें मन हें करुनी स्थिर
करित मी नत मी भुवनेश्वर!
    तव दया सदया त्रिपुरेश्वरा!
    लव तरी वितरी करुणाकरा!

२

प्रखर हा विखरा भव ईश्वरा!
विभव-विस्तर दुस्तर हा खरा
    सुरवरा! रव रानिं जसा तसा
    श्रुतिपथीं अपटो तव वेणुसा

३

विकल हा कलहाग्नि करीतसे
भवतमीं चरमीं बुडवीतसे
    विहित जें हित तें मजसी कथा
    अमृतशी मृतसंजिवनी कथा.

४

प्रभुवरा! भव हा मज गांजितो
सकलहीं कलहीं मज गोंवि तो
तव पदीं विपदीं कथितो कथा
हरि! हरी तरि तीव्र मनोव्यथा

५

जरि मलीन विलीन तुला हरी!
जतन या तनयास तरी करी
वनगजा नगजांतरिं तारिलें
विकट संकट तूंच निवारिलें

६

सुरतती रतती तुझिया पदीं
स्मरति नामरति प्रिय पुण्यधी
नमुनिही मुनिही श्रमती अती
विहगपा! मग पामर मी किती!

७

अजपते! जपते तुज मन्मती
नति अतीव तुझ्या चरणाप्रती
निपट लंपट हा जन आदरी
सकरुणा करुणा! विनतीं करी

## ३ स्मृतिचित्र

प्रेमानें सविलोल दृष्टि करुनी माझ्याकडे पाहसी
'दादा' या मधुरस्वनें निशिदिनीं तूं बाहसी वाटतें
किंवा या समयीं स्वमातृमृदुला मांडीवरी लोळसी
चित्रें रम्य अशीं सदा भुलवितीं या माझिया चक्षुतें

ताई! तें तव रम्य हास्य, मृदुसें तें गोंडसें बोलणें
तैसें बागडणें मदीय हृदया जें नित्य गे डोलवी
तें आईवरतीं रुसून बसणें, तैसें तुझें चालणें
पाहोनी तुज घ्यावया कटिवरी हे हस्त मी लांबवी

तों सारें स्मृतिचित्र तत्क्षणिं अहा! अदृश्य तें होतसें
आशाभास लयास जाउनि सये! नैराश्य गे दाटतें
तूं मातेजवळीं–फणींद्रपुरिं मी–आतां करावें कसें?
वायूच्यासह भेटण्या तुजप्रती यावें असें वाटतें

ऐसें हें स्मृतिचित्र गा! विभुवरा! तूं कासया निर्मिलें
दुःखाचे हृदयावरी निशिदिनीं आघात जें देतसें!

# ४ श्रीरामटेक

( वसंततिलका )

१

वैडूर्यरत्नविमलद्युतियुक्त ऐसें
विस्तीर्ण सौख्यद सुशीतल गोड तैसें
यद्वारितीर्थ नित सेविति साधुसंत
श्रीरामसागर तडाग सुशोभिवंत

२

विद्युत्प्रभाधवल हें जल पाहुनीया
वाटे जणूं सुरधुनी प्रगटे स्थलीं या
कीं हीं समस्त कविचीं सुयशें रमाया
येथें जणूं प्रगटलीं प्रभुनाम गाया

३

कीं इंदुचें धवल तेज इथें निमालें
श्रीरामसागरजलांतरि लीन झालें
कीं साधुचे शुभ यशोमय हंस आले
रामार्णवोत्पालिं अहा! मकरंद झाले

४

पाहोनि मंदपवनोत्थित तत्तरंगा
वाटे जणूं युवति ह्या निज अंगभंगा-
प्रेमें करोनि रमती स्थलिं याच; कां हें?
चांचल्य हा युवतिचा गुणधर्म आहे

५

कीं ईशधामधर हा गिरिराज याचे
पादांबुज प्रथम आपण सेविण्याचे
नाना विचार करुनी युवती सवेगें
ह्या धांवतात गमती प्रभुभक्तिरागें

६

किंवा स्मरोनि पद त्या रघुनंदनाचे
कासारिं भक्तवर द्विजवृंद नाचे
श्रीरामनाम जपती निज मुग्ध वाचें
त्यांचेच मंजु रव हे गमतात साचे

७

श्रीरामसागरतरंग पदाब्ज ज्याचे
प्रक्षाळिती निशिदिनीं प्रभुधारकांचे
सीताफळादि तरुयुक्त असा नितांत
हा शोभतो गिरि पहा प्रभुधामयुक्त

८

पाहोनिया हरितशा सरल द्रुमांतें
सेनापती सहज हे गमती मनातें
चीत्कार ज्यांतुनि निघे कपिसैनिकांचा
धैर्योदधी गमतसे गिरि हाच साचा

९

कोठें कुठें विलसती बहु मर्कटाली
जी रामनाम जपनांत! निमग्न झाली
नाना स्थलीं दिसति वृंदहि निर्झरांचे
हर्षाश्रु जे गमति बा! गिरिकंदराचे

१०

ऐशा चमत्कृति धरी गिरि हा अनेक
शोभे तयावर सुरालय 'रामटेक'
ज्या पाहतां श्रम समस्तहि ते निमाले
भक्तीरसांत मन फार विलीन झालें

११

अंतःप्रवेश करितां सखया समोर
सौमित्रमूर्ति हृदयाप्रति तोष फार-
देते, अहा! हरितसे नयनाप्रती ती
यन्मूर्ति साधु हृदयीं निज रेखिताती

१२

जो शांत सागर गमे करुणामृताचा
शौर्योदधी दिसतसे भुजयुग्म ज्याचा
नेत्रीं यदीय विलसे निजबंधुभक्ती
सौमित्रमूर्ति हृदयांतरिं कोरिली ती

१३

त्या मागुती निवसतो प्रभु रामचंद्र
सीतापती, सरसजानन, राघवेंद्र
इक्ष्वाकुवंशज दशाननदानवारी
नित्य स्वभक्तदुरिताप्रति जो निवारी

# ५ कवितेस !

१

तूं देवी कविते ! कुरंगनयने ! शृंगारिं गे न्हाउनी
भक्तीच्या हरितांशुका सुरुचिरा नेसोनिया कामिनी !
नानावृत्तसुरत्नमंडित तयीं सन्मेखला बांधुनी
भ्रूक्षेपें कवि सर्व विद्ध करुनी ये चंचले ! धावुनी

२

तैशीं सुंदर रूपकादि विमले ! घालोनिया भूषणें
लावोनी प्रतिभा जणों तिलक हा भालीं सुमंदेक्षणे !
स्निग्धे ! कुंतलपाशिं भावसुमनें खोवोनिया कोमला
स्वभ्रूचापलतेस सज्ज करुनी ताडीत ये मौर्विला

३

कीं नाना स्वर राग ताल करुनी यांचीं सखे ! नूपुरें
लेवोनी झणि तीं स्वकोमलपदीं तूं गात ये सुस्वरें
देवी ! त्वद्विरहें सुदीन बघ ही पुष्पावली जाहली
काव्योद्यानिं करूनि केलि चपले ! दे वृत्ति त्या चांगली

४

ये ये सत्वरि ये अतां सुकविते ! चंद्रानने ! धावुनी
प्रेमें शुद्ध परस्परां भुजयुगें निःशंक आलिंगुनी
प्रेमामाजिं निमग्न होउनि अहा ! आकंठ तृप्ती वरूं
काव्यांचीं सुमनें रसाळ रसिकां अर्पीत लीला करूं

## ६ अभागी शेतकऱ्याचे उद्गार

( मंदाक्रांता )

१

हा! हा! कैशी सदय विधिनें वांकडी दृष्टि केली
सौख्यामाजीं अवचित अशी मृत्तिका कालवीली
ना पाहोनी करुणवदना पुत्रपौत्रादिकातें
व्याजाच्या त्या ज्वलित दहनीं लोटिलें हाय! मातें

२

शेतें सारीं वृषभ महिषी बालवत्सें तयांचीं
ज्यांनीं केली मजसह सदा चाकरी मातृभूची
शेतामाजीं सुखद दिन मी ज्यासवें घालवीले
श्रीमंताच्या अदय वदनीं सर्व ते भक्ष्य झाले

३

ऋग्वेदादी उरजनिमिषें सेविती नित्य जीतें
पान्हा येतां अमृतमधुर क्षीर जी प्रस्रवीते
सेवायातें निशिदिनिं जिला सिद्ध तो धेनुपाल
गाई ज्यांच्या सदनिं असती धन्य! ते क्षेत्रपाल!!

४

रानातूनी परत फिरतां बालकानंदिनीचें
गोशाळेंत स्वकरपुटिं मी काढिलें दुग्ध जीचें
गोमाता ती कृषिभगवती मद्गृहीं एक होती
झाली आतां सदय मजशीं देवता पारखी ती!

५

क्षेत्रीं धान्यें डुलत असतां मंद मंदानिलानें
भावी सौख्या तरलनयनें पाहिलें मी सुखानें
आनंदानें रमणिसह ज्या त्या स्थलीं गोष्टि केल्या
दुर्दैवानें स्मृतिविषय त्या सर्वही आज झाल्या!

६

कांदा चटणी तिखट पिठलें त्यासवें लोणचें तें
उत्संगस्था मलिनवसना चारुनी बालकातें
आनंदानें विहिरिवरती खात होतों सुखांत
सौख्याची त्या स्मृतिहि मजला जाळिते अंतरांत

७

जेव्हां मेघध्वनि गडगडां अंबरीं होत आहे
सोसाट्याचा मधुनि मधुनि वायुही वाहताहे
पर्जन्याच्या अवनिवरती वृष्टि त्या वर्षतात
आषाढाचे भयद दिन ते कंठिलें वावरांत

८

थंडीयोगें बहुतम जनां सोडवेना गृहातें
त्यामार्जीही भयद रजनी किर शब्दा करीते
ऐशा वेळीं तनुवरति मी घेउनी घोंगडीला
पौषाच्या त्या भयदहि निशा वावरीं कंठियेल्या

९

माध्यान्हीं तीं तरणिकिरणें तापतांना वरून
वायूच्या त्या गरम लहरी वाहतां भूवरून
ग्रीष्माच्या प्रज्वलित दहनीं देह हा भाजताहे
अंगांतूनी दरदर असा! घामही वाहताहे

१०

केव्हां केव्हां नच मिळतसें अन्नही खावयातें
केव्हां केव्हां नच मिळतसें पाणिही प्यावयातें
त्यावेळींही स्वकरिं धरुनी नांगरा नांगरीलें
कष्टांचें त्या अदय नशिबा! हेंच कां चीज झालें?

११

गेलें गेलें मदिय असलें सर्व तें सौख्य गेलें
श्रीमंताच्या वदनिं, करिं या मृत्तिकापात्र आलें
दारोदारीं निशिदिनिं अतां मागुनी नित्य भिक्षा
बालांची या मजसि करणें हाय! देवा सुरक्षा

## ७ आशेस

( आर्या )

१

झाली धन्य जगीं तूं जन्मुनिया सौख्यदायिनी आशे!
हृदयान्दोलनचपले! लोकत्रय बांधिलें तुवां पाशें

२

गोड गुलाबी स्वप्नें किंवा तुजमाजि दिव्य जो चटका
आस्वादनीं तयाच्या भासे इहलोक सर्व हा लटका

३

तूं भाग्य अभाग्याचें, आशे! कांचन अकिंचना जगतीं
तूं प्रेम विरहि तरुणां, तुजविण अन्या नसे तयांस गती

४

स्वातंत्र्य बंधयुक्ता, विलास गे तूं वियुक्त रमणाचा
आनंद दुःखितातें, किंवा पुत्रचि अपुत्रनरमणिचा

५

नवपुत्रवती माता घालुनि तुज पाळण्यांत हिंदविते
निज भावी सौख्याचें चित्र जणूं ती तयांत डोलविते

६

आशे! विरहींगण हा तंतूंचा तव करूनिया दोला
झोके घेइ तयावरि भूपाळ्या गात गात प्रेमाला

७

मीही तुजवर टांगुनि अपुला बहुमोल जीव हा आतां
भिक्षेस्तव आलों, दे भिक्षा, तुजविण नसे कुणी दाता

८

जगतीं तुझीच आशा, तुजविण कोणी मुळीं न मज आशे!
झाली पूर्ण निराशा इतरत्राहि बद्ध जी करी पाशें

९

साम्राज्यांत तुझ्या ने आलों आलों तुला अतां शरण
दाखव मज मधु स्वप्नें किंवा दे त्यांतची मला मरण

१०

परि नीरस जीवनिं या मातें कधिंही पुन्हां नको ढकलूं
सर्वज्ञे! नकळे मज हृदय कसें हें तुझ्यापुढें उकलूं?

## स्वप्नीं तुला पाहत

१

देवी! ज्या दिवशीं गडे! मज घडे त्वत्पुण्यदा दर्शन
सौन्दर्यतृषितां चकोरहृदयां कीं चन्द्रिकामीलन
तेव्हांपासुनि तेवते हृदयिं या सौन्दर्यज्योती तुझी
तीतें ध्याउनि भावपूर्णनयनें मी गुंगतों मानसीं

२

एकांतांत बसोनिया शशिकले! चित्रें तुझीं चित्रिलीं
अर्धोन्मीलितनेत्रपद्मयुगुलीं त्वन्मूर्ति आराधिली
ध्यावोनी तव रूप, तो मुखशशी—ती बालरोमावली
तूतें मंजुल गाइलीं बहुपरीं निःशब्दसूक्तावली

३

त्या तूझा सुरतप्रवेश बघुनी आंदोलल्या भावना
हो रोमांचित ही तनू कितितरी आनंद झाला मना
हर्षाश्रू नयनीं उभे, हृदयही उल्लोललें प्रेमले!
कांहीं श्लोक तसेच अस्फुटरवें ओठावरी गाइले

४

जा बाले! रतिरंगमंदिरिं अतां शृंगारिं तूं दंग हो
सौख्याचा मधु वायु पंचशर तो तुम्हावरी पालवो
—मीही आठवुनी मदीय नशिबा, दुःखाश्रु हे गाळित
कोठें आणि कसा तरी पहुडतों स्वप्नीं तुला पाहत

# कौतुक कोण करी ?

१

दीनहृदय—सुंदरी !
तयाचें कौतुक कोण करी ? ॥

चन्द्रमिषें कविहृदय उघडलें
विश्व झोंपलें परी
तयाचें कौतुक कोण करी ?

२

रानफुलें वनिं सुगंध उधळिति
पर्वा काय तरी
तयांचें कौतुक कोण करी ?

३

वेडा गणुनी निर्धन कविला
सर्व लोटती दुरी
तयाचें कौतुक कौण करी ?

४

शुद्ध तसें हें प्रेम आपुलें
आहे जरि अंतरीं
तयाचें कौतुक कोण करी ?

५

निर्धन आपण, खोट्या जगता
मार लाथ सुंदरी
तयाचें कौतुक कोण करी ?

६

चाल, जाउं गे वनीं कुठें तरि
विरून वाऱ्यावरी
तयाचें कौतुक कोण करी ?

# संगमोत्सुक

१

होता तेवत शुक्रदेव गगनीं फेकीत मंद प्रभा
स्वर्गाच्या वलयांत दाट जमली तारावलीची सभा
आले मंजुल गीत गात गगनीं सप्तर्षिंचे पुंजही
झाले स्नान करून शुद्ध नभिच्या गंगेंत जे सर्वही

२

सृष्टीला मधु गीत गात सरिता अंकीं तिच्या झोपल्या
रानाला निजवीत निर्झरतती गुंगावया लागल्या
झांकोनी अवघ्या महीस अपुल्या निद्रासती अंचलीं
ब्रह्मानंदनिमग्न होउनि अहा! डोलावया लागली

३

या ऐशा समयीं कुणी निजगृहीं सौंदर्यसौदामिनी
कांतेतें दृढ बाहुपाशवलयीं सप्रेम आलिंगुनी
ओष्ठींची मधुरा सुधा रमणिच्या ओष्ठींच कीं चाखुनी
स्वसौख्यीं रमला असेल हृदयीं अत्यंत आनंदुनी

४

येतां नाजुक कल्पना हृदयिं या माझ्या अशी प्रेमले!
नीं हास्यें-तव ते विलास अवघे ध्यानीं मनीं घोंळले
अन् देवी! तव संगमोत्सुक अशा सद्भावना जागल्या
दुर्दैवें परि हाय! हाय! अपुल्यामध्यें नद्या घातल्या!!!

# पेरणी

(दिंडी)

१

गगनिं आल्या ह्या नीलमेघमाला
तोष झाला बहु कृषिकमानसाला
वनीं हंबरते गाय, जाणुनी तें
घरीं वासरुंही साद दे तियेतें

२

आम्रवृक्षाच्या तळीं दाट छायीं
गुराखीनी आणुल्या सर्व गाई
देह अपुला हा घोंगडिनें झांकी
गोड पावा अन् वाजवी गुराखी

३

ऐकुनीया त्या मुरलिच्या रवाला
गुंग झाल्या तें सर्व धेनुबाला
डुलकि येतां—हालतां कंठ त्यांचा
मधुर होतो रव क्षुद्रघंटिकांचा

४

लिखितचित्रासम दृश्य अचल सारें
धन्य ! ते नादब्रह्मिं गुंगणारे
गोप शोभे तो साम्य माधवाला
गमति गाईही मुग्ध गोपबाला

५

दहनकिरणीं जी तापुनिया राही
अन्नपूर्णा जीसमा दुजी नाहीं
जलदवर्षे ओलावली धरा ही
तिच्यासंगें युवतिचीं मानसेंही

६

हरुनि दुःखाचा उष्ण तो सहारा
मंद शीतल हा वाहतसे वारा
मधुर सुटला जो वास मृत्तिकेचा
तुच्छ त्या पुढती गंध कस्तुरीचा

७

कृषिकबाला बालकें सुखानें तीं
मेघमाला सोत्कंठ पाहताती
'तुला पैसा देईन' आळवीती
भावि काळाचें मधुर गीत गाती

८

प्रभातीं जोडुनि बैल तिफण घेई
पेरण्याला हा शेतकरी जाई
गळ्यामधल्या घंटिका नादवूनी
बैल टाकिति हें रान मोहवूनी

९

केस भुरुभुरुती मंद मंद वातें
कृषिकबाला या भुलविती मनातें
चपल वायूला आळवीत गीतें
भावि सौख्याच्या करितिं पेरणीतें

१०

( मालिनी )

मधुरतर किती गे! सौख्य बाले! अहा! हें
मधुरमधुर गीतें गात ऐशीच राहे
विमल नयनिं तूझ्या फेकुनी दृक्‌-शरातें
निरखित तुजला मी स्तब्ध राहीन येथें

# श्री मुक्ताबाईच्या समाधीपाशीं—

१

देवी ! त्वच्चरणारविन्दयुगुलें मी जेधवां देखिलीं
भक्तिज्योति तदा मदीय हृदयीं तेवावया लागली
गंभीर द्युतिनें तिच्या धवळलें पापिष्ट हें मन्मन
श्रीमुक्ते ! वरदे ! तुझ्या गुणगणीं मी जाहलों तल्लिन

२

निवृत्ति प्रभु, ज्ञानदेव गुरु तो, श्रीदेवसोपान हे
जाया श्रीरघुनाथपादयुगुलीं कीं मूर्त सोपान हे
त्यांची ती बिरुदावळी स्मरुनिया मद्वृत्ति आनंदली
ध्यावोनी हृदयीं तदीय चरणें सप्रेम मी वंदिलीं

३

ताईंची करुणार्द्र निर्मल तुवां गंगा दुजी निर्मिली
जीमाजीं अवगाहुनी बुधसभा त्वद्रूपता पावली
होतां दर्शन देवि ! तोषद तुझें प्रेमें समुत्कंठुनी
माझ्याही वदनांतुनी झुळुझुळू ती पाझरे स्यंदिनी

४

जे संदेश तुझे तुवां पसारिले ओघावरी तीचिया
अद्यापी घुमतात जे श्रुतिपुटीं या मर्त्यलोकाचिया
ते संदेश सुखें निनादिति मुखें हेमाद्रिचे कंदर
अद्यापी मधु गीत तेंच वदतो रामेश्वरीं सागर

५

ते ऐकून मृदंग टाळ स्वकरीं घेवोनिया भाविक
येती नाचत गात हांसत, सुखें धि:कारुनी ऐहिक
त्यांची पाहुनि वृत्ति ती तरुतती सानंद ह्या डोलती
वृक्षस्थद्विजराजही कलरवें त्वद्गीत आलापती

६

त्यांचे ते पडसाद ऐकुनि अहा! गंभीरता ये मना
देवी! त्या खगकूजितीं हृदयिच्या हेलावल्या भावना
श्रीमुक्ते! मज मुक्ति दे तव पदीं ही प्रार्थना बोलुन
गेलें मन्मन हें विरून चरणां तूझ्या समुत्कंठुन

# मी काय त्यावांचुन—

(सुनीत)

आशावल्लिवरील रम्य मधुरा सोनूकल्या पांखरा!
रे मन्मानसहंस! सोडुनि कसा गेलास तूं ही धरा
वार्ता ती नच हाय! हाय! हृदया ते बोचले वाग्शर
अन् डोळ्यांमधुनी तदा झिरपले दुःखाश्रुचे निर्झर

होतां त्वद्विरहें सचिंत हृदयीं आशा अशा जागती
कीं येशील सुखें त्वरें परतुनी तूं आपुल्या भारतीं
या आशेवर जीव टांगुनि सख्या! मी पाहिली वाटुली
तों हें काय मधेंच? हाय! मजला निःसत्व भू जाहली

बाल्यापासुनिया परस्परगुणीं स्नेहाळलों आपण
गंगेच्या पुलिनीं दिनान्तसमयीं केलें मधू कूजन
तो शब्दच्छल–तो विनोद–अपुलीं तीं रम्य गप्पाष्टकें
आतां आठवतांच तीं हृदय हें आहाळतें सारखें

नेलें उज्वलरत्न मदूहृदयिचें देवा! तुवां चोरुन
आतां ने मजलाहि त्यासह सुखें, मी काय त्यावांचुन?

## काळास—

१

रे! थांब जरा तूं घडीभरी
येउ दे मला तव बरोबरी ॥ धृ ॥

हातामध्यें हात गुंफुनी
बालपणाच्या रम्योद्यानीं
लुटुलुटु तुरुतुरु धांवत जाउनि
खेळ करूं या परोपरी

२

ताई माझी धांवत येउनि
कोमल हस्तें मुख गोंजारुनि
मटमट अपुले मुके घेउनी
हंसविल अपणां बहुत परीं

३

देवघरीं खाटेवर निजउनि
लडिवाळपणें पाठ थोपटुनि
चिउकाऊच्या गोष्टी सांगुनि
निजविल आजी सुखांतरीं

४

गोठाणीं हंबरतां गाई
पहांट होतां, करुनी घाई
दहीं खावया उठविल माई
चल ताव मारुं रे! दह्यावरी!

५

रम्य काळ तो बाळपणाचा
निदिध्यास मज भोगायाचा
–छे! तूं कसचा परतायाचा
त्या गोष्टी आतां युगांतरीं!

६

एक वेळ तूं दिह्लिस रमला
तेथुनि विजयानगरिं फडकला
अतां सुखें पश्चिमेस भुलला
भोगीत भोग रे! घरोघरीं!

७

शतकें गेलीं–युगें लोटलीं
अनेकदां ही जनता मेली
मेली–गेली–पुन्हां जन्मली
तूं अजुनी असशी तोच परी

८

वातावरणीं पंख उभारुनि
निश्चळतेनें टक लावोनी
चराचरांतें पाहसि नयनीं
जगिं धन्य तूंच रे! खरोखरीं

९

पुराण पुरुषा वंदन तुजला
जा जा अपुल्या कर कार्याला
पर्वा न तुझी मुळींच मजला
तारील मला तो देव हरी!

---

# उचकी

१

होतों घांस गिळीत आणि उचकी तेव्हां मला लागली
प्यालों पाणि पुनःपुन्हां न परि ती थोडीहि मंदावली
कोण्या प्रेमळ माणसास अपुला झाला असे आठव?
आला प्रश्न मनांत तोंच हृदयीं हो कालवाकालव!

२

साऱ्या प्रेमळ मूर्ति हृत्पटिं अहा! धाविन्नल्या तत्क्षणीं
त्यामाजीं तव मूर्तिनेंच जननी! लावीयली टोंचणी
दूरस्थाप्रति गूढ मुग्ध हृदिचे संदेश जी पोंचवी
आई! ती उचकी तुझ्याविण दुजें तें कोण गे पाठवी?

३

सोडूनी निजपुत्र दूर शिकण्या गेला कधींपासुनी
त्यातें आठवुनी मनीं भगवती! बाष्पाकुलालोचनीं
अश्रूंनीं अभिषिक्त घांस वदनीं कैसे तरी लोटित
आई! तूं असशील गद्गदरवें प्रेमें मला बाहत!

४

होतां आठव माउली तुजकडे हा जीव ओढावतो
तूझी काय दशा असेल? नयनीं बाष्पौघ! गे वाहतो
पत्रीं स्वास्थ्य कळीव; दुःख परि तूं कैसें तरी हें सहा
विद्येसाठिंच मीहि अश्रु गिळितों कोंडूनिया शोक हा

# सौन्दर्यास !—

१

सौन्दर्या ! तुजसाठिं घोर घडले संग्राम भूमंडलीं
तेणें लालभडक हाय ! अवघी ही भूमि रंगाथिली
सांम्राज्यें उलथोनियां धडधडां धूळीस नेलीं किती
मित्रद्रोह कितीक तूं घडविले नाहीं तयांतें मिती

२

साध्या आणिक भावड्या युवतितें खेंचोनियां वागुरीं
अंतीं दाखविली तुवांच अदया ! नैराश्यतेची दरी
आशेच्या क्षितिजावरी बसुनि जे त्वद्‌गायनीं रंगले
ते मेले सगळे तुझ्यास्तव परी तद्भाव तूं भंगले !

३

झाले हे इतुके अनर्थ तरिही तूझ्यावरी भाळती
होवोनी अगदीं भणंग समुदें पायीं तुझ्या लोळती
जावो जीव खुशाल कीं जन तया बोलोत वेडे कुणी
धिक्कारूनि तयास ते हुरळती प्रेमें तुझ्या ईंधनीं

४

मीही ओळखतों पुरा तुजप्रती चाळे तुझे जाणतों
दृष्टीला पडतां परी थबकतों वेड्यापरी पाहतों
डोळे हे खिळतात चित्तहि सख्या! बर्फापरी पाझरे
स्वच्छंदें मग त्यांतुनी झिरपती प्रेमोदकाचे झरे

५

पुंगीनें करितो तटस्थ अहितें जैसा महागारुडी
टोचोनी गळ खेंचितो निजबळें कोळी जसा मासळी
नादें चंचल गोपिकांस थिजवी श्रीकृष्णवेणू जशी
तेवीं तूं मज आपुल्या द्युतिबळें त्वद्बंधनीं गोंविसी

६

मी या कामुक मानसास वळवी नानापरी सांगुनी
नाहीं तें परि येत मागुति मुळीं तूझ्या समाधींतुनी
रोवोनी तुझियावरी टकमकां हे नाचरे लोचन
स्वप्नें पाहत गोड, मंजुल रवें प्रेमें करी गुंजन

७

सौन्दर्या! असशी खरा जगतिचा अदृश्य तूं चालक
कांहीं अद्‌भुत शक्ति खास वसते तूझ्यामधें मोहक
तीतें मोहुनि जीव हे तव पदीं घेतात लोटांगणें
माझींही तुजला असोत शतदां सप्रेम हीं वंदनें



---

# १७ पूर्णेच्या तीरावर

१

शैले भेसुर उंच उंच गगना ज्याचे कडे भेदित
सप्तशृंग नगेंद्र हा पसरला उत्तुंग या बाजुला
धाण्यांनीं भरलीं टपोर कणसें वाऱ्यावरी फेंकित
शेतांचीं हिरवीं बनें पसरलीं आनम्र त्या बाजुला

२

शैलाग्रावरुनी धडाधड बळें झाडेंझुडें मोडित
ये फेंसाळत स्वर्नदी इकडुनी पूर्णा सुपुण्योदका
शेतांच्या हिरवाळितून अपुल्या मार्गास चोखाळित
गंगा येत हळूं हळूं तिकडुनी आमंद मंदोदका

३

आलिंगोनि परस्परांस हृदयीं दोघीजणी सातुर
लीलासंगमिं दंगुनी सुखभरें येथोंचि मंदावल्या
त्यांचें कौतुक पाहण्यास्तव उभा तीरावरी शंकर
ज्याच्या पादतळीं अनेक भजकीं पुष्पांजळी वाहिल्या

४

येतां दृष्टिपथांत रम्य स्थळ हें दामोदरा! आपुलें
    व्हावा आठव या जिवाप्रत तुझा, आश्चर्य कांहीं नसे
दोघांनीं बसुनी इथें कितितरी सुश्लोक आलापिले
    पूर्णेच्या लहरीसवें कितिकदां झालोंत वेडेपिसे!

५

संध्या तांबुस रंगतां कुतुहलें न्हाऊनि पूर्णोदकीं
    शिंपाशंखहि वेंचुनी शिवपदीं घेऊनि गेलों कधीं
वंदूनी गिरिजापती, खुडुनियां शेतांतलीं वाळकीं
    गेलों टाकित मंद मंद चरणें माघार खेड्यामधीं

६

आहे पर्वत तोच, तींच हिरवीं शेतें बनें सुंदर
    येथें वाहति संथ त्याच सरिता दुग्धाळल्या सोज्वला
आहे देउळ तेंच, तोच तरुही, हा तोच श्रीशंकर
    सारें तेंच-परी उदास दिसतें तूझ्याविना दृष्टिला

७

गेला ज्या दिवशीं उडून वरतीं दिव्यांबरीं लोपुनी
    तेव्हांपासुन विश्व शून्य गमतें निःसत्वता पातली
द्याया धीर अतां हताश हृदया या कातळीं बैसुनी
    छाया पाहत आपुलीच विरतों मातीपरी या जळीं



---

## १८ इंद्रधनुष्य

१

काळेश्यार विशाल मेघ सहसा येवोनिया अंबरीं
एकाकी प्रमदाप्रकंपद अशी झाली सुरू गर्जना
गेला झांकुन सूर्य अभ्रपटलीं काळोखली मेदिनी
वाऱ्याचा धुडगूस भीषणरवें स्वच्छंद झाला सुरू

२

थोडे थेंब टपाटपा निथळुनी माघार जातात तों
पाण्याच्या सहसा सरीवर सरी वर्षावया लागल्या
थोडा वेळ प्रताप गाजउनिया गाळोनि मुक्ताफळें
गेले सर्वहि मेघ एकजुटिनें वायूसवें धांवत

३

आलीं घालित शीळ मंजुळ रवें खोप्यांतुनी पांखरें
मातीचा पसरीत गंध झुळुका वाहावया लागल्या
झाला मेघविमुक्त सूर्य, पडलीं आल्हाददायी उन्हें
रंगी इंद्रधनुष्यही उमटलें पूर्वेकडे अंबरीं

४

देखावा हृदयास तोषद असा पाहावया पातलों
बाहेरी -तंव हृश्य काय दिसलें सामोर गच्चीवरी!
बाला -छे नवयौवनोत्कट कुणी देवांगना कोमला
होती पाहत नेत्र लावुनि वरी देवेंद्रचापाकडे

५

काळे केस, विशाळ नेत्र, तरल भ्रू, ओष्ठ बिंबापरी
शोभे रम्य कपोल पांडुर-वरी किंचित् छटा आरुणी
इंद्राचें झुलतें धनुष्य रमवी भावप्रियेचें मन
त्या दृश्यावर लोभलें सुखभरें मन्नाचरें लोचन

६

त्या तंद्रींत कितीक काळ सरला ठाऊक नाहीं -परी
जेव्हां लोचन मी हळूं उघडि -तों कोणि दिसेना तिथें
गेलें इंद्रधनू पुसून -विरली बालाहि वाऱ्यावरी
दुर्दैवी परि मी तिथें विरमुनी वेड्यापरी राहिलों!!

# १९ शिवबास

( वसंततिलका )

१

मूर्ती तुझी विमल दृष्टिपथांत येतां
त्वद्वन्दनार्थ नमवील न कोण माथा!
दे धैर्य वीर्य सकलां अतुलप्रतापा।
ही प्रार्थना तव पदीं शिवराज भूपा!

## २० क्षमस्व

आवरितों मन बहुपरि, परि न आवरे तें
विषयाच्या झाड्यांतचि गुरफटून जातें

ओळखतों पूर्णपणें जग असार सारें
परि यौवन फिरुन फिरुन हृदया घुसळीतें

नेत्रयुगुल विषयमदें धुंद होउनीया
पापमार्ग मात्र अचुक धुंडाळित जातें

भलभलत्या कल्पनांहि हृदय मलिन झालें
सकल जगत अपणासम मलिन भाविते तें

काय जाहलें न कळे —सर्व तुझी लीला
परि आतां मन माझें मजलागीं खातें

आठवतां पूर्व चरित नेत्रिं पूर लोटे
कांहीं तरि सलतें उरिं हृदय भरुनि येतें

पश्चात्तापें धुतलें मलिन हृदय माझें
आतां तरि तूं क्षमस्व! दीन बालकातें

# २१ नक्षत्रावलि अंबरीं लुकलुके—

( सुनीत )

नक्षत्रावलि अंबरीं लुकलुके, कां बोलतां वांकडें
हे डोळे मिचकावती बघुनिया माझ्या नशीबाकडे
तारांनो! उपहास व्यर्थ करितां कां टोचुनी मन्मना
नाहीं ठाउक काय मद्हृदयिच्या तुह्मास संवेदना

होतें शक्य जरी तरी हृदय हें फाडूनिया टाकतों
त्यामाजीं करपून थंड पडल्या आशा तुम्हा दावितों
तें ना शक्य परी, ह्मणून कढतों पात्रस्थ दुग्धापरी
कैसा शांतवुं? कोण ओतिल तयीं शीतोदकाची सरी!

जें नाहीं लिहिलें समर्थ विधिनें माझ्या नशीबांत या
त्यासाठीं झुरतें उगीच मन हें आयुष्य जातें लया
यावे तापद हे विचार हृदयीं, आश्चर्य कांहीं नसें
दुःखाचे कढ मी मनीं निशिदिनीं देवा! गिळावे कसें!

यापेक्षां मज गांजल्यास जरि तूं नेशील बा लौकरी
होईन प्रभुजी! कृतज्ञ तव मी आजन्म जन्मान्तरीं

## २२ गालबोट—

माझ्या छकुलीचे डोळे
    दुध्या कवडीचे डाव
बाई! कमळ चमळ
    गोड चिडीचं ग नांव!

जरि बोलते ही मैना
    माझी अजून बोबडे
मला लागति ते बाई
    खडीसाखरेचे खडे!

सर्व्या जगाचं कौतुक
    इच्या झांकल्या मुठींत
कुठें ठेवुं ही साळुंकी
    माझ्या डोळयाच्या पिंजऱ्यांत!

कसे हांसले ग खुदूकुन
    माझ्या बाईचे हे ओठ
नजर होईल कोणाची
    लावुं द्या ग गालबोट!

## २३ महाश्वेतेची दिनचर्या

(वियोगिनी)

१

"फुलतें प्रिय पुण्डरीक हें
किरणांनीं रविच्या इथें यदा
बघण्यास तया सकौतुका
मधु निद्रेतुनि जागतें तदा

२

मग याच तडागिं नाहुनी
धरुनी तोच कमंडलू करीं
मृदु नेसुनि तींच वल्कलें
स्मरतें जीवितनाथ अंतरीं

३

जपमाळहि तीच घेउनी
मम हृत्पुण्डरिकास जी प्रिय
मणि ओढुनि एक एक मी
असतें चिन्तनिं नित्य तन्मय

४

सदया मग त्या दिनापुनी
मनिं संसार असार जाणुनी
विषयांतुनि चित्त काढुनी
बसलें घोर वनांत येउनी

५

कळलें मम मन्द भाग्य हें,
विधिही निष्ठुर, प्रेम दुःखद,
जगिं सर्वहि मर्त्य, एक तो
गिरिजानाथ खरा सुखास्पद

६

म्हणुनी जनकास सोडुनी
प्रिय माता—परि तुच्छ लेखुनी
अवरोधुनि सर्व इंद्रियें
बसलें येउनि घोर या वनीं

७

व्रत घेउनि ब्रह्मचारिणी
हृदयीं तो धरिला उमापती
अशरण्य जनां शरण्य जो
मज त्राता शरणार्थिनीप्रती

८

दिवसांतुनि स्नान तीनदां
उदरीं वन्य फलें मुलें जलें
वदनीं मधुनाम तें सदा
जपजाप्यें वरुनीच–घोळिलें

९

सुमनें हररोज पूजुनी
करुनी आरति मी सखीसवें
भजनीं गिरिजेश्वराचिया
क्रमितें दुःखद शेष आयु हें"

# २४ स्मृतितरंग

१

काळी पैठणी नेसुनी नटुनिया आली दिवाळी सती
रस्त्यांतून समस्त संथ दिवल्या आशेपरी जागती
नक्षत्रावलिचीं नभांत झुलतीं नीरांजनें लागलीं
शीतांशुध्वजशुभ्रमौक्तिकसरीं भूदेवि शृंगारली

२

मोत्यांचीं भरघोंस शुभ्र कणसें बांधोनि नीलांचलीं
निद्रामाउलि वावरांत डुलत्या धान्यावरी पेंगली
गांवांमाजि परंतु रात्रभरही जागोनि सारे जन
उत्साहें सुमहोत्सवांत करिती दीपावलीचा सण

३

आम्हीही उठलों प्रभातसमयीं म्हाली घरीं पातला
लावोनी मधुगंधि तैल, उटिका अंगास संमर्दिला
केलें स्नान सुखांत शीतल जलें, वंदोनि पूर्वेप्रती
वाजें हींव म्हणून सर्व जमलों आम्ही चुलीभोंवतीं

३

गर्दी विठ्ठलमंदिरीं करुनिया झांज्या मृदंगावरी
गाथ्यांतील अभंग संतजन हे गानात उच्च स्वरीं
त्यांना साथ करी सुगोड सनई भूपाळिया गाउनी
आनंदी जन सर्वही--तुजमुळें दुःखी परी मी मनीं

४

अण्णा! तूं असतां तरी सुखद ही होती दिवाळी किती
त्वद्वेणू तुज दीपभेट ह्मणुनी कांहीं तरी धाडती
मी--व्हावी परदेशिं उज्वल यशःप्राप्ती तुला सर्वदा
यासाठीं असती अनन्य हृदयें आराधिली शारदा

५

कीं एकत्र सपत्नि मित्र अनुले बोलाउनीया घरा
दीर्घायू तुजसाठिं आम्हि असतें मागीतलें ईश्वरा!
किंवा आठवुनी--पुरे परि तुझ्या या कल्पना कल्पने!
चित्रें चित्रिशि कां अशींच करिती जीं साश्रु मल्लोचनें

६

ज्या आशाविटपावरी बसुनिया मी गात होतों सुखें
तो खालीं पडला तुटून करुनी सर्वांस आह्मां मुकें
नाहीं वृक्ष दुजे जयावर अतां विश्रांति घेऊं असे
आधाराविण मी मधे तळमळे देवा! करावें कसें

---

## २५ निरोप घेतांना—

१

आलों सोडुनिया तुला न असतां इच्छा तुझी प्रेमले !
देतांना मजला निरोप नयनीं अश्रू तुझ्या पातले
मुक्ते ! ठेव असाच लोभ तव या बालावरी सर्वदा
कोठेंही मग मी असो, सुख मला देतील गे ! आपदा

२

'तूं माझा' म्हणुनी उदारहृदयें स्वीकार केला तुवां
हें पूर्वार्जित पुण्य ना मज गडे ! हा लाभ झाला नवा
कोठें पामर मी सुरोपम तुझी ती दिव्य मूर्ती कुठें ?
दारिद्र्यगृहिं कामधेनु वळलीं आश्चर्य हें केवढें !

३

आर्ये ! त्वच्छुभपादपद्मयुगुलीं हा जीव लोभावला
नेते ओढुन दूर दूर परि ही कर्तव्यनिष्ठा मला !
कर्तव्या ! तुज बाह्य देह दिधला, मुक्ते ! तुला प्राण हा
माते ! नित्य असो अशीच मजला त्वद्दर्शनाची स्पृहा !

## २६ मार्गप्रतीक्षा—

(आसावरी)

१

शिणलों वाट बघून । प्रेमले !   ॥ धृ ॥

पथप्रतीक्षा करुनी माउलि !
गात्रें सारीं हीं पांगुळलीं
कळ पायाला अतां लागली
गेला जीव गळून । प्रेमले !

२

नेत्रें पाण्यानें डबडबलीं
तरी न तुज कां करुणा आली
माय कशी मम मला विसरली
दिलें काय टाकून । प्रेमले !

३

कृष्णवर्ण घन येउनि अंबरिं
जळें तोषवी कृषिक भूवरीं
वार्ताही नच पुसशी तूं परि
पत्र मला धाडून । प्रेमले !

४

चटका लाउनि गेलिस हृदया
मौन अतां करि विव्हल काया
अशीच असते वेडी माया
टाकि मना हुरकून । प्रेमले !

५

सहवासांतिल तुझ्या दिवस ते
आठवतां हृद् भरुनी येतें
कधीं सांग गे ! या दीनातें
देशिल भेट फिरून ? । प्रमले ।

## २७ निंदकास—

( मालकंस )

न पर्वा मला कांहिं निंदो कुणी
असा गात राहीन मी मन्मनीं

न सद्भाव ज्यांच्या मुळीं अंतरीं
तयांचीं वचें घेउं कां लावुनि ?

जरी भुंकतें श्वान अंगावरी
तरी सूज्ञ चाले तया टाळुनी

कडाडे तडित् मेघ गर्जे जरी
तरी शांतता सागराच्या मनीं

तसा मी गणीं तुच्छ या निंदका
कुणाच्या कसा राहुं मी बंधनीं!

तिरस्कार माझा करो कोणिही
हंसो वा रुसो वेष हा पाहुनी

तरी आवडे मानवे वा जसे
तसा नित्य राहीन मी उन्मनी!

## २८ अंगाई—

१

काय झालं सोनुलीला?
    रडूं कशाच डोळ्यांत
पोरक्या वासरावाणी
    कशापायीं ह्या आकांत?

२

डोळ्यांतल्या आंसवांच्या
    पाणीदारशा मोत्यांनीं
झंवरलें काहून ग!
    लाल गुलाब हे दोन्ही

३

रडु नको ग! अं हं! मी
    देतें बाईला भुळ्जाई
हांसतील कशा मग
    ओठावर जाईजुई

४

जांभया कां देशी अशा
  नीज आली कां मैनेला !
झोप झोप छबुकडे !
  मीच थोपटतें तुला

५

जाय उडून रे ! हाड्या
  नको करू काव काव
नीजते ही पांघरूनी
  लुगड्याचा माझ्या शेव

६

गुंगी जाईल निघून
  हड हड दूर आकू
डोळा लागला बाईचा
  वायकारणी नको भुंकू

७

ये ग ये ग हम्मा ये ग
  दुदु दे ग तान्हुलीला
राघो ! पळत ये तूंही
  घाल वारा साळुंकीला

८

पाय वजे वजे टाका
गोड गोड ओव्या ह्मणा
चारा घेऊन तुम्हि या
टांगा मैनाइ ! पाळणा

९

चिड्या रंगीत तावाच्या
द्या ग ! त्यावर लावून
गुलाबांच्या पाकळ्याचं
करा छान अंथरूण

१०

मीच निजवीतं त्यांत
माझ्या जिवाची ही राणी
हिंदवतें अन् बाईला
गात गात गोड गाणीं

## २९ पेरणीसाठीं--

१

कराया पेरनी । तुम्हि चाला व ! समूधा जनी
भाजी भाकर लौकर रांधा
मोहन, ठेसा त्यावर कांदा
पालवामंधीं चट्कन् बांधा
न्याहारि घेऊनी । तुम्हि चाला ०

२

आभायांतुन मोत्यावानी
मिर्गाचं ग ! पड्लं पानी
म्हने बापुया सोबद काहाडुनी
करा पेरऽनी । तुम्हि चाला ०

३

पऱ्हाटिचं र्शी घे तूं पारे !
तूं घे जोंधं, तूं धर गोऱ्हे
चाडं, मोघं ऱ्हा ग म्होरे
घेउन्श्यानी । तुम्हि चाला०

४

काढुन अशि हां करता वट्वट्
पाय आपलं उचला चट्पट्
चला भुरं वाऱ्यांत झट्पट्
पांखरावानी । तुम्हि चाला०

५

उशिर न अक्षी लावा कांहीं
अटपा बिगिबिगि करा ग ! घाई
वर्ठी नाहितर माज्या पायीं
रडल घर धऽनी । तुम्हि चाला०

# ३० आटपाट नगरांत--

१

आटपाट नगरांत
    नांदे राजाची ग राणी
नांव मैनाई तियेचें
    रूप गोड फुलावाणी

२

नाहीं नोवऱ्याचा पत्ता
    कुळशिळ न माहीत
चौदा चौकड्याचं राज्य
    तिच्या होत पदरांत

३

अंबाबाईच्या कृपेनं
    पायीं लोळण घे सुख
तिला सांळुका नांवाची
    एकुलती एक लेक

४

लेक एकुली राणीची
    गोरीपान जशी सीता
मग शृंगाराच्या तिचा
    थाट काय विचारतां

५

तिला राहाया छानसा
    खोपा सुग्रणीनं केला
एका आंब्याच्या डांगीला
    तिचा बांधला झिकोला

६

रुपे अंगाला तियेच्या
    मउ रुवाचा गालीचा
पांघराया पलंपोस
    अरणीच्या पाकळ्यांचा

७

झोप जेव्हां घेइ बाळी
    वारा विझणा पालवी
कोणी पाय चुरी कोणी
    टाकी अंगीं शाल नवी

८

अशा थाटांत चालले
    दिन राणीच्या लेकीचे
वर्षें महिने सरले
    वय झालें लगीनाचें

९

शेव आला साळुंकीला
    झाली पोर चवदाची
दिसे जशी फुललेली
    कळी गुलाब फुलाची

१०

देशोदेशींच्या राजांनीं
    केली पोरीला मागणी
पण साळुंकीच्या मना
    आला नाहीं त्यांत कोणी

११

तिनें सावित्रीसारखी
    पृथ्वी घातली पालथी
निवडला एक राघो
    तिच्या जन्माचा सोबती

१२

झाली लग्नाची तयारी
घरीं आला नवर्देव
आभाळाच्या मांडवांत
फुटें वऱ्हाड्यांचं पेंव

१३

रूपें नोवरा देखणा
मोठ्या टेकानं तो चाले
डोळे पाणीदार, ओठ
जसें भेदरें पिकलें

१४

आणि नवरीचें तोंड
सोनचाफ्याचं फूलच
पण एका खोडीपायीं
झालं मातेरं रूपाचं

१५

पाय तिचे काळेकुट्ट
जसें लढ्याचें ओंगण
येतां ध्यानांत राघोच्या
उतरलं त्याचं मन

१६

ज्ञानोश्यांत वऱ्हाडणी

मुरडत होत्या नाकं

पाहुन तें साळुंकीच्या

उरीं भरला ग धाक

१७

ह्मणे 'काय करूं देवा

घडी मोडते लग्नाची'

सय झाली तिला तेव्हां

मोरु दादाच्या पायाची

१८

गेली रातोरात घरीं

दिठ टाकून सर्व्यांची

दीनवाणी होउनिया

करी आळवण त्याची

१९

मोरु दादाच्या मनांत

तिनं पेरली साकर

ह्मणे 'अशा वेळीं दादा—'

माझ्यावर दया कर

२०

एका पंधर्वाड्यासाठीं
    पाय उसणे दे तुझे
वागवीन जन्मोजन्मीं
    उपकाराचें मी ओझें

२१

आली दया मोरोबाला
    घेववली त्यानं आण
पाय देऊन स्वताचे
    तिचे घेतले आपण

२३

दोघांचाही हा करार
    ठावा नव्हता कोणाला
गेली साळुंकी उडून
    थाट लगीनाचा झाला

२४

गेली सासऱ्याच्या घरीं
    केला संसार सुखानं
पाय परत द्यायची
    आण गेली विसरून

२५

दिन गेले, गेले महिने
वर्षे कितीक लोटलीं
घरीं मोरोबांची स्वारी
वाट पहात बैसली

२६

क्षण पायाकडे पाहे
पाहे क्षण नभाकडे
काळे पाय दिसतांच
येतें डोळ्यामधें रडें

२७

वेड लागलें मोराला
गेला सोडून नगर
राहे जंगलांत सदा
जसा कोणी साधू थोर

२८

जेव्हां जेव्हां येती नभीं
ढग काळे काळे भोर
सय होऊन पायांची
दाटुनिया येतो उर

२९

अंग शहारे तयाचे
    तेव्हां उभवी पिसारा
पाय आपआपटून
    गाळितसे अश्रूधारा

३०

होवो दुःख वा हरिख
    आसूं डोळयांत तयार
आसवांच्या दानामुळें
    चाले तयाचा संसार

३१

पर्णाच्या ग लेकीवर
    चुकूनिया विसंबले
ह्मणूनिया मोरोबाला
    दुःखफळ प्राप्त झालें

—=०=—

# ३१ ही कोण ?

१

गोफण घेउनि करीं
उभी ही कोण माचव्यावरी ? ॥ धृ. ॥

कणसांमधलें मोति खावया
झांक खगांची येई स्थलिं या
पांगोरा तो वाजवुनीया
हाकी वरचेवरी । उभी ही ०

२

शेव डोइवर चंद्रकळेचा
बाणा करि परि रणमर्दांचा
गोफणितां कर बिल्लोरांचा
ध्वनी चित्त मम हरी । उभी ही ०

३

कैऱ्या कणसें पोटरकींचीं
हिरें माणिकें हींच आमुचीं
भाग्यदेवि कां शेतकऱ्याची
घेउनि ये भूवरीं ? उभी ही ०

४

तीक्ष्ण नजर शेतावर फेंकुनि
देई उजळा पिका लागुनी
वेळ कंठिते मधुनी मधुनी
गात गात भल्लरी । उभी ही

५

धांड्यांचीं सळसळतां पानें
घे कानोसा स्थिर चित्तानें
तोंच दिसे घरधनी-तयानें
लाजे बहु अंतरीं । उभी ही ०

# ३२ शिवाजी आणि चिपळूणकर

( मंदारमाला )

१

यानें स्वराज्यांत त्यानें स्वभाषेंत

उत्कृष्ट चैतन्य उत्पादिलें

यानें स्वधर्मास त्यानें कवी-

विस्मृतीच्या दरींतूनिया ओढिलें

स्वातंत्र्यविद्वेषि नीचांस यानें

तयानें स्वभाषेचिया निंदकां

खड्गें तथा लेखणीनें स्वताच्या

रणीं लेखनीं चीत केलें न कां!

२

आज्ञापुनी पंडिताला शिवानें

जुने उर्दु शब्द स्वभाषेंतले

वेंचून सारे खड्यासारखे ते

उकीड्यांवरी फेंकुनीया दिले

या विष्णुनें आंग्ल भाषेंतले
श्रीमहाराष्ट्रवाग्देवतामंदिरीं
चौर्येच्छु जे नीच त्यांच्या न माने-
वरी ठेविली काय सांगा सुरी ?

३

मातेस सोडूनिया आपल्या
यावनी दास्यकांतेस जे भाळले
स्वातंत्र्यपियूष पाजून त्यांना
शिवानें तिच्या सेवनीं लाविलें
या विष्णुनें आंग्लभाषाविमुग्धांगना-
सेवनीं नित्य जे रंगले
त्यांना स्वमाता महाराष्ट्र भाषा
तिच्या राउळीं कां नसें आणिलें ?

४

होता शिवाजी न, जाती तरी
मातृभूमी अविंधांचिया बंधनीं
शेंडी शिरीं राहती ना मुळीं
भ्रष्ट होत्या सदा हिंदुच्या नंदिनी

विष्णूविना पूज्यभाषा मराठी
तशी हाय ! हीं कां न आंग्लाळती ?
सौभाग्य होतें न कां नष्ट तीचें
तिची काव्यगंगा न कां भ्रष्टती ?

५

या क्षात्रतेजा भिवोनी रणीं
गाळिले गर्भ प्रत्यक्ष शत्रूंनिही
त्या विष्णूच्या ब्राह्मतेजें विवादीं
भयाभीत झाली न कां ही मही ?
दोघांसही देउनी जन्म हो ही
महाराष्ट्रभू धन्य ! आर्यांगना
येतां स्मृतीमाजि नांवें तयांचीं
कुणाचा न माथा लवे वंदना

६

अद्रिस्थ दुर्ग स्ववाङ्मंदिरें नित्य
आलापिती तद्यशोगायनें
दोघांसही अंबरीं श्रीनिशा रोज
ओवाळि नक्षत्रनीरांजनें
अर्पी प्रभातीं फुलें जन्मभूमी
तिच्या लाडक्यांच्या समाधीवरी
दोघांचिही वैभवें पाहुनी हीं
न हो हर्ष कोणाचिया अंतरीं

## ३३ आई!

१

आई! बालपणीं तुला कितितरी या बालकें त्रासिलें
प्रेमानें सुतवत्सले! परि तुवां तें सर्वही साहिलें
होतां चूक सुताकडून तव या तूंही मला मारिलें
वात्सल्यें परि तूंच शेवटिं मला अंकावरीं घेतलें!

२

होतां क्लेश मला तुझा मुखशशी निस्तेज व्हावा गडे!
अश्रुक्लिन्न मला बघून नयनीं तूझ्याच यावें रडें
जावा हृज्जलधी तुझा उचंबळुनी—येतां मला आपदा
व्हावें चित्त तुझें विदीर्ण शतधा माझ्या वियोगें सदा

३

वर्षांतीं परतें घरीं—तंव तुला आनंद व्हावा किती
'माझा विष्णु हुषार फार' म्हणुनी प्रेमें करावी स्तुती
स्नेहानें कर कोंवळा फिरवुनी पाठीवरोनी गडे!
घालावे शिरिं माझिया मग तुवां हर्षासवांचे सडे

४

आई! वत्सलता न ती मज अतां विश्वांत कोठें दिसे
प्रीतीवांचुन जीव हा तडफडे—लागे तयाला पिसें
नाहीं आश्रयभूत व्यक्ति दुसरी—तूझ्या स्मृतीवांचुनी
तूं गेलीस, अरण्य केवळ मला हें विश्व तेव्हांपुनी!

## ३४ माझी ताई

(दिंडी)

१

सान कलिका ही जातिवल्लरीची
स्नेहगंगेची जणों रम्य वीची
ताई माझी - कल्पना सत्कवीची
निरागस किंवा मूर्ति मधुरतेची

२

इच्या नयनीं रवि शशी बैसवीले
कपोलावरि सुमगुच्छ काय डोले
नील कुंतलिं अलिपुंजभास होतो
तिलक भालीं सौंदर्य भूषवीतो

३

कुणी म्हणती शशिकोर नभीं आली
परी खोटी ही असे सर्व बोली
कोर नच - विलसतें व्योमभागीं
अंगुळांचें नख इच्या धवलरंगीं

४

शानु अमुची मंजुषा सद्‌गुणांची
बालप्रतिमा निज मातृदेवतेची
म्हणुनिया हे गुंतले असाति ताई !
पांचही माझे प्राण तुझ्या पायीं

५

मातृविरहें मज विश्व शून्य झालें
तुजमुळें परि चैतन्य त्यांत आलें
येइ शांते ! मज देइ गोड पापा
तुच्छ लेखिन मग मी समस्त तापा

## ३५ जुन्या गृहास—

(दिंडी)

१

तुला जातां सोडून दुःख वाटे
नेत्र युगुलांतुनि अश्रुपूर लोटे
कंठ दाटे—रोमांच अंगिं येती
वर्णवेना मज हाय! अवस्था ती

२

इथें राहुनि कांठिलें बाल्य आम्ही
मातृअंकीं या स्थलीं लोळलों मी
स्नेहभावें जल घालुनी सुवेळीं
जाइजुइच्या या वाढविल्या वेली

३

—आणि येथें—हुंदका आवरेना
लेखणीनें तें दृश्य वर्णवेना
इथुनि माझी प्रेमला मातृवल्ली
घरीं देवाच्या निघुन हाय! गेली

४

अशा स्मृतिनीं प्रिय तूंच मला लोकीं
गृहा! त्या तुज सोडणें आज शोकीं
पाय वळाति न, मज चित्त इथें गुंगे
गृहा! शेवटचा नमस्कार हा घे

५

कार्ययोगें प्रियतमा या स्थळाला
कधीं काळीं हा बाळ जरी आला
तरी बघुनी तुज कसा विस्मरेल
इथें गाळाया अश्रु दोन तीन!

## ३६ हें सुख काय तुझ्या नगरीं ?—

१

हें सुख काय तुझ्या नगरीं ? ॥ धृ ॥

चंद्रमौळि ही जीर्ण खोपटी
गुरें पेंगती तीच्या निकटीं
क्षुद्रघंटिका श्रवणसंपुटीं
ओपिति रव माधुरी । हें सुख०

२

स्नेह सुनिर्मल, श्रद्धा प्रेमल,
विचार कोमल, मन गंगाजल
सद्गुण शशिकर हा खेड्यांतिल
रमवी चित्त चकोरी । हें सुख०

३

स्वार्थाचा नच इथें पसारा
परमार्थाचा वाहे वारा
मातृभूमिरत जन हा सारा
हृदयीं ध्यात मुरारी । हें सुख०

४

रामपहारीं हरिभजनध्वनि
जागृत करि मज सहसा येउनि
घर्घर रव जात्याचा कर्णी
प्रभुगुण गायन वितरी । हें सुख०

५

स्वार्थ-दंभ-मद लंपट शहरीं
समाधान मिळणार कुठुन तरि
देई आश्रय मला सदा हरि!
माझ्या खेड्यांतरीं । हें सुख०

## ३७ अनुत्साह

( वसंततिलका )

जाणें उद्यां न परि उत्सुकता मनाला
दु:खार्णवांत जननी! जन हा बुडाला
जाऊनि काय करूं माऊलि! मी गृहातें
मूर्ती तुझी न मजला दिसणार तेथें!

## ३८ तुझ्या शोधांत—

१

तुझ्या भेटीसाठीं आई !
किती आतुरला जीव
शोधशोधण्यांत तुला
दंग सारे देहभाव

२

येतां चाहाळ अंगणीं
कान घेतात कानोसा
जाय झेपाउनी तेथें
जीव माझा वेडापिसा

३

कोठें दिसतां साउली
आलीस तूं वाटतसे
मान वेळून पाहतां
निराशेचें भूत हांसे

४

कुणी गुणगुणतां गाणें
    भाव हृदयीचे हालती
तुझ्या स्मृतीचे स्नेहाळे !
    धागे धागे उकलती

५

उचंबळुनीया चित्त
    नेत्रीं अश्रू तरंगती
बिंदुबिंदुमाजीं त्यांच्या
    तुझीं रूपें आंदोलतीं

६

वेडें मन धरूं जातां
    मोत्यें सारीं निथळती
मूठ उघडून पाहतां
    दिसे नैराश्याची माती

७

कोनोकोनी देवी तुला
    जीव शोधून भागला
नैराश्याच्या दीपावीण
    प्रकाश न कोणी दिला

## ३१ संगमावरील सायंकाळ

( केशवकरणी )

१

अरुणवर्ण उधळीत करानें निजपतिवदनावरी
हांसली पश्चिम दिक्सुंदरी
सप्तवर्णभ्रूचापनियोजित कटाक्षशर-संकरीं
विंधिला दिनमणि हृदयावरी
मोहुनिया तों रविरायानें घट्ट धरोनी उरीं
गोंविली बाहुद्वयपंजरीं
मन्मथें दृढालिंगुनी स्वयें ती रती
घेतले तियेचे मुख्यावर मुके किती
ती लाजलाजुनी अर्धी झाली सती
खेळ तयाचा पाहुनि लाजे पूर्व दिशा अंतरीं
गुलाबी कोडें रसिकां करी

२

गर्व गळाला भान हरपलें अर्धस्फुट लोचनी
पश्चिमा दंग सौख्यसेवनीं
वस्त्र गुलाबी इतरस्तां पसरलें शिथिल होउनी
तयाची वार्ता ना तन्मनीं
सौख्यसमाधिस्थ त्या द्वयावर इतर दिशा-कामिनी
टाकितां मेघ-वस्त्र गुंफुनी
गुंगवाया द्विज गाणीं गाती कुणी
पालवी तयांना मलयानिल येउनी
पर्यंकीं निज वधुवरांस त्या घेउनि
अस्तागिरीवर श्रीशुक्राचा मंददीप लावुनी
बैसली गात सांध्य यामिनी

३

त्रास न द्यावा तया म्हणोनी मंजुळ रव काढुनी
परतल्या अतां पक्षिपाक्षिणी
प्रभात समयीं गोपासह ज्या वत्स घरीं ठेवुनी
निघाल्या चरायातें वनीं
त्याच धेनुबालिका गळ्यांतिल नादवुनी किंकिणी
उधळल्या अतां गृहालागुनी
वाजवी गुराखी श्रवणमधुर पांवरी
त्या साथ देति पुटपुटत विपिन निर्झरी
घुटमळे नाद तो कोंदुनि गिरिकंदरीं
सकल सृष्टि जाहली गानमय, मारुतलहरीवरी
विरला नाद तोच अंबरीं

४

मधुर मधुरतर सृष्टिसतीचा गोड गळा ऐकुनी
लाजल्या सर्व अप्सरा मनीं
मुरलीधर कृष्णाच्या वेणुस्वना जशी मोहुनी
राधिका न कळत जाते वनीं
तशी हळू-लाजून येत एकेक नभीं चांदणी
जातसे देहभान विसरुनी
गुणगुणूं लागल्या जेव्हां साऱ्या जणी
निघतात मधुर गीतराग तों त्यांतुनी
चवथीची आली चंद्रकोर रिंगणीं
अष्ट दिशा भोंवतीं तियेच्या करांत कर गुंफुनी
जाहल्या दंग सर्व नर्तनीं

५

दृश्य सकल हें हृदयसंपुटीं प्रेमें कवटाळुनी
वाहते अमंद मंदाकिनी
किती जाहले तरी जान्हवी अंबरपथगामिनी
प्रिय तिला स्वर्गांतिल भामिनी
बालवयीं आपुल्या खेळली अमूप दिनयामिनी
तयांसह सुरेशनंदनवनीं
जरि अतां भूतलीं दुर्दैवें पातली
तरि नाहीं निज मैत्रिणीस ती विसरली
ह्मणुनींच तया घेउनी स्वधवलांचलीं
मूर्त मैत्रिणीप्रेम जगाला दावित सगरांतुनी
चालली डुलत जन्हुनंदिनी

६

गंगामाई ! हृदय किती तव उदार सदये ! दिसे
सदा तें तुडुंब वत्सलरसें
किती जीव तारिले तुवां गे ! बुडावयाच्या मिषें
तयाची गणती मजला नसे
आठवतां तुज उचंबळे मद्‌हृदय लागतें पिसें
तुझ्याविण जगीं करूं मी कसें ?
जरि बालक तव हें जगास कंटाळलें
तुज अगतिक होऊनिया शरण पातलें
तरि कृपा करोनी त्यावर सुतवत्सले !
घेई तव उदरांत माउली ! ठेवुनि अतिसौरसें
विनंती हींच एक तुज असे

७

ऐकुनि अभ्यर्थना चालली पुढें वामलोचना
कराया स्वयें वल्लभार्चना
तोंच भेटली हिरण्वती तिज देउनि आलिंगना
रंगली तिथें त्र्यंबकांगना
उपमादेविस जणूं भेटली कालिदासकल्पना
भासला संगम तो मन्मना
कीं स्वयंस्फूर्त भक्तीस मुक्ति लाभली
रागिणीस कीं उत्तरा इथें भेटली
लतिकेस मालती काय प्राप्त जाहली
किंवा भेटे कादंबरिला स्वयें हंसनंदना
शक्तिला कार्योत्सुक कामना

८

आलिंगनसौख्यांत होउनी दंग मनीं रंगती
तयाचे तरंग वर्णूं किती!
वार्ता माहेरची विचारी उत्सुक भागीरथी
सांगते तिला ती हिरण्वती
होउनिया एकरूप गोष्टी सांगत दोन्ही सती
चालल्या पुढें सुसत्वरगती
जाउ दे कल्पने! तयालागि गुंगत
अडविशी कशाला व्यर्थ तया सांप्रत
जाशील कोठवर?— अनंत गिरिजापथ
परत फीर ये सखे! नातरी सज्जन तुज हांसती
तारका डोळे मिचकावती

# ४० आमची शांता

शांता ताई छान । आमुची ॥ धृ ॥

श्रवणमनोहर मत्कवनांच्या
स्फूर्तीची ही खाण । आमुची०

मातृवेलिवर उमले किंवा
सुंदर कलिका सान । आमुची०

गंधर्वांच्या संगीताची
मूर्तिमंत कीं तान । आमुची०

टाकिन ओवाळुनि हिजवरुनि
अमूल्य ही मत्प्राण । आमुची ०

दयाघना ! तूं जपुनि ठेव हें
माझें शांतिनिधान । आमुची०

## ४१ लव्हाळीं

१

खेड्याच्या पायाशीं नदीच्या थडींत
जन्मलीं गान्यांत लव्हाळीं हीं
नांव गांव कांहीं रंगरूप नाहीं
फळें फुलें तींही कोठचीं त्यां ?
बेंडकोळ्या सदा डुँडुँवती भोंती
आंतुन टोंचती क्षुद्र जन्तु
सोसूनियां परी सर्वही आघात
दिन कंठितात शांत चित्तें ?

२

नदीच्या लाडक्या लेकी-लहरींशीं
चाले अहर्निशीं खेळ त्यांचा
रानावनांतील देवतांचीं बाळें
शृंगाराचे चाळे साधे त्यांच्या
अंगा घुसळीत सदा वीची येती
चरणां लागती प्रेमभावें
अनुनयें त्यांच्या आनंदुनी चित्तीं
मान डोलविती लव्हाळींही

३

अतिथि कोणीही घरालागि येतां
नमस्कारिती त्यां आदरोनि
प्रेमसरितांच्या पुरीं नाहतांना
वांकविती माना नम्रतेनें
राग द्वेष सारा सांडुनिया दूर
कारिती संसार समाधानें
कौतुक तयांचें करील ना कोण
सदा पायीं लीन लोकांच्या जे ?

# परिशिष्ट [ टिपणी ]

१ **आवाहन** ( धंतोली नागपूर ऑगष्ट १९२९ ) हीं कडवीं ' कांचन-माला ' नांवाच्या एका संकल्पित खंडकाव्याची प्रस्तावना म्हणून लिहिलीं होतीं. पहिल्या दोन कडव्यांत श्लिष्ट शब्दांनीं बहुतेक आधुनिक कवींचीं व त्यांच्या कृतींचीं नांवें गोंवलीं आहेत.

ओळ ३।४ रविकिरण मंडळ पुणें. त्यांचें ' प्रभा ' नांवाचें प्रकाशन
" ५।६ विहंगमवृंद, नागपूर. त्यांचें 'पिंपळगान' नांवाचें प्रकाशन
" ७ चंडोल—रा. टेकाडे. पहा आनंदगीत प्रस्ता. पा. ७ ओळ२५
" ८ पोपटपंचि—रा. जयकृष्ण केशव उपाध्ये कृत.
" ९ भृंग—Bee. रा. नारायण मुरलीधर गुप्त आकोला
" १०।११ शारदाश्रम यवतमाळ. त्यांचें ' विदर्भ**वीणा** '
क. २ ओ. १।२ रा. दुर्गादास आसाराम तिवारी. त्यांचें ' चंडिकाशतक '
" ३।४ रा. चंद्रशेखर व त्यांचें गोदागौरव नांवाचें खंडकाव्य.
" ५।६ प्रो. बेहेरे, व त्यांचें ' स्मरणी ' नांवाचें खंडकाव्य.
" ७ रा. भवानीशंकर श्रीधर पंडित. नागपूर.
" ८ रा. कुसुमाकर कवि, मुंबई. यांची ' उन्मनस्काचें गीत' ह्मणून एक सुंदर कविता आहे.
अनिल—रा. आ. रा. देशपांडे फुलवात कर्ते.
" ९ झेंडूचें फूल—रा. केशवकुमारकृत झेंडूचीं फुलें.

" १०।११ रा. भास्कर रामचंद्र तांबे. स्वर्णकण—पहा. तांब्यांची कविता
भाग २ ' क्षण साफल्य ' कविता. ओळ १ ली

क. ४ ओ. ५ पहा ' ये नाम केचिदिह नः प्रथयन्त्यवज्ञां
जानन्तु ते किमपि तान्प्रति नैष यत्नः '

२ **करुणासप्तक** ( खामगांव हायस्कूल ऑक्टो. १९२४ )

३ **स्मृतिचित्र** ( मॉरिस कॉलेज वसतिगृह नागपूर. सप्टें. १९२५ )
चि. कु. शांतास उद्देशून लिहिलेली कविता

४ **श्रीरामटेक** ( मॉ. कॉ. व. नागपूर. सप्टें. १९२५ )

५ **कवितेस** ( मॉ. कॉ. व. नागपूर. आक्टो. १९२५ ) क. १
ओळ २ cf Red is the colour of love and youth
Green is the colour of faith and truth

६ **अभागी शेत० उद्गार** ( मॉ. कॉ. व. नागपूर. जाने. १९२६ )

७ **आशेस** ( नरखेल. ता. २९ ऑक्टो. १९२६ )
येथून सौंदर्यास पर्यंतच्या कवितांना अनुक्रमांक द्यावयाचे
चुकून राहिले. ते द्यावे.

८ **स्वप्नीं तुला पाहत** ( नरखेल ता. २५ ऑक्टो. १९२७ )

९ **कौतुक कोण करी ?** ( मलकापूर ता. ३१ मे १९२७ )
चाल ' अगाध कांहीं तरी ' या टिळकांच्या गीतासारखी.

१० **संगमोत्सुक** ( मलकापूर ता. ४ जून १९२७ )

११ **पेरणी** ( मलकापूर ५ जुलै १९२७ )

१२ **श्रीमुक्ताबाईच्या०** ( आरंभ कोथळी—एदलाबाद येथें. पुन-
र्लेखन मलकापूर ता. ६ जुलै १९२७ )

१३ **मी काय त्यावांचुन ?** ( मलकापूर जुलै १९२७ ) ही, पूर्णेच्या
तीरावर व स्मृतितरंग ह्या तिन्ही कविता माझे मित्र

के. दामोदर मारोती पाटील, नरवेल यांना उद्देशून लिहिल्या आहेत. औद्योगिक शिक्षण घेण्यासाठीं ते जर्मनींत गेले असतां तिकडेच त्यांचा मृत्यु झाला.

१४ **काळास** (वाय्. एम्. सी. ए. नागपूर २२ ऑगस्ट २७)

१५ **उचकी** (वाय्. एम्. सी. ए. नागपूर. ता. २६ ऑगष्ट १९२७)

१६ **सौंदर्यास** (वाय. एम्. सी. ए. नागपूर ता. १५ सप्टेंबर १९२७)

१७ **पूर्णेच्या तीरावर** (मलकापूर ता. २८ आक्टोबर १९२७)
१३ व्या कवितेवरील टीप पहा. पूर्णा ही नरवेलच्या उत्तरेस सातपुड्याच्या पायथ्याशीं वाहणारी नदी असून नळगंगा व पूर्णेच्या संगमावर कोटेश्वर देवालय आहे. याच देखाव्याचें वर्णन पहिल्या ३ कडव्यांत आलेलें आहे.

क. १ सप्तशृंग—सातपुडा या अर्थी.

क. ५ वाळकीं (अनेकवचन) शेतांत लागणाऱ्या एका वेलीचीं फळें. हीं खाण्याच्या व भाजीच्या उपयोगांत येतात.

१८ **इंद्रधनुष्य** (नरवेल डिसेंबर १९२७) क. २ ओ. ३. मेघाच्या पोटांतून मोत्यांची उत्पत्ति होते हा संस्कृत कविसमय लक्षांत घेऊन ही ओळ वाचावी. पहा—करींद्रजीमूतवराह-शंखमत्स्याहिशुक्त्युद्भववेणुजानि। मुक्ताफलानि प्रथितानि लोके तेषां तु शुक्त्युद्भवमेव भूरि ॥

१९ **शिवबास** (या कवितेचा लेखन काल टिपून ठेवलेला नाहीं.

२० **क्षमस्व** (वाय्. एम्. सी. ए. ता. २० फेब्रु. १९२८) जाति—प्राची—‘ अजुनि लागलेचि दार उजळे ही प्राची ’ ही चाल.

२१ **नक्षत्रावलि०** ( मलकापूर ता. १६ नोव्हेंबर १९२८ )

२२ **गालबोट** ( मलकापूर ता. १९ नोव्हेंबर १९२८ ) चाल. जाति ओवी. या कवितेंत खेड्यांतील लहान मुलींच्या तोंडची भाषा वापरलेली आहे. अभिनय करून हें गीत ह्मटल्यास त्यांतील खरें माधुर्य प्रत्ययास येईल.

ओ. २ डाव (१) जेडि (२) कवड्या खेळतांना फडकविण्यासाठीं व दुसऱ्या कवड्यांवर मारण्यासाठीं मोठी कवडी निवडतात ती. ही कवडी ओळखूं येण्यासाठीं हिची पट बाजू दगडावर घालतात. तसें केलें ह्मणजे तिच्यावर आपल्या डोळ्यांतील बुबुळा प्रमाणें काळसर गोल भाग तयार होतो व ही कवडी दुध्या रंगाची असली ह्मणजे तर वर सांगितल्या प्रमाणें घासल्यावर ती पूर्णपणें आपल्या डोळ्यासारखी दिसूं लागते.

ओळ ४ चिडी—चिमणी.

२३ **महाश्वेतेची दिनचर्या** ( १५ नोव्हेंबर १९२८ ) बाणभट्टाच्या कादंबरींतील महाश्वेतेच्या आत्मचरित्राच्या उत्तर भागावर या कवितेची उभारणी झाली आहे.

क. ४ पुनी—पासून

२४ **स्मृतितरंग** ( धंतोली नागपूर ता. ९ सप्टेंबर १९२८ ) १३ व्या कवितेवरील टीप पहा.

क. १ ओ. २ दिवल्या (ए. व. दिवली ) पणत्या, खापराचे दिवे.

" " ४ शीतांशुचीं ध्वजरूप असलेलीं शुभ्र मौक्तिकें (तारा) त्यांच्या सरांनी ( हारांनीं, मालिकांनीं )

क. २ ओ. २ वावर—शेत

" ३ " १ म्हाली—न्हावी (मशालजी—मशाली—महाली—म्हाली. लग्नप्रगसंगीं मशाल धरण्याचें काम न्हाव्याकडे असतें)

" ओ. २ टिकसा—उटणें.

" ६ ' विटापा ' ऐवजीं ' विटपा ' वाचावें.

" ३ यापुढील कडव्यांचे आकडे चुकीचे पडले आहेत ते दुरुस्त करून घ्यावे.

२५ **निरोप घेतांना** (लेखनकाल टिपून ठेवलेला नाहीं) श्री.पांचलगांवकर महाराजांना उद्देशून ही कविता लिहिली आहे. मुक्तेश्वर त्यांचें दैवत.

२६ **मार्ग प्रतीक्षा** (धंतोली नागपूर ता.२४सप्टें.१९२९) जाति-मेनका

२७ **निंद्‌कास** ( धंतोली नागपूर ता. २७ सप्टें. १९२७ )

२८ **अंगाई** (धंतोली नागपूर ता. २७ सप्टें. १९२९ )जाति—ओवी.

क. ३ ओ. २ भुल्‌जाई—बाहुली.

" ५ " १ हाड्या—कावळा (हड्डुकः या संस्कृत शब्दापासून. पहा. विविधज्ञानविस्तार ऑगस्ट १९२८ पा. ३२१ )

" ओ. ४ शेव—पदर

क. ६ " २ आकू—कुत्रा. ओ. ४ वायकारणीं—विनाकारण

" ७ " १ हम्मा—गाय " २ दुदु—दूध

" ८ " १ वजे वजे—हळूं हळूं

" ९ " १ चिड्या—चिमण्या, पताका; ताव—कागद

२९ **पेरणीसाठीं** ( धंतोली नागपूर ता. २९ सप्टें. १९२९ )

चाल. भाव धरा रे । अपुलासा देव करा रे

क. १ समूद्या—सर्व; मोहन—तेल, अर्थात् गोडेल; ठेसा=तिखट.

२ आभाय—आभाळ, आकाश; वानी—सारखें; मिगाचें—मृगाचें; बापुया—चातक पक्षी. हा पावसाळ्याच्या आरंभाला येऊन 'पेऽरते व्हा ' असे शद्ब काढतो. त्यावरूनच शेतकरी पेरण्याची तयारी करायला लागतात.

क. ३ पऱ्हाटी—कपाशीचें झाड; चाडं—ज्वारी पेरण्याचें लांकडी यंत्र. मोघं—सरकी पेरण्याचें लांकडी यंत्र.

क. ५ घरधनी—नवरा, मालक.

३० **आटपाट नगरांत** ( धंतोली नागपुर ५ आक्टो. १९२९ )

क. ५ ओ. ३ डांग—फांदी; झिकोला—पाळणा

" ६ " २ रू—सरकी काढून घेतलेला कापूस. पलंपोस—चादर. अरणी—एका रानफुलाचें नांव. या फुलाचा वास दुरुन फार चांगला येतो. पण फूल कुस्करल्यावर मात्र त्याची फार घाण येते.

" ९ " १ शेत्र येणें—पदर येणें, न्हाण येणें

" ११ " ३ राघा—राघू. पोपट.

" १३ " २ टेक--ऐट; भेंदरें- तमाटा

" १४ " ३ खोड--व्यंग

" १५ " २ लढें--भरतीचा मोठा गाडा

" २१ " २ आण--शपथ

" २८ " ३ सय--आठवण

" ३० " ३।४ मोराचे अश्रू पिऊनच लांडोरीला गर्भधारणा होते हें प्रसिद्धच आहे.

३१ **ही कोण?** (मलकापूर ता. ५ नोव्हेंबर १९२९)

क. १ मात्रचा–शेतांत उंच बांधलेला गवती माचा; झाक–समुदाय. पांगोरा–बुजगावणें.

क. २ चंद्रकळा–लुगड्याचा एक प्रकार.

क. कैऱ्या–कपाशीचीं हिरवीं बोंडें; पोटरकीचीं कणसें–दाणे भरत चाललेलीं हिरवीं कणसें.

क. ४ भल्लरी–विश्रांतीसाठीं गावयाचें गाणें.

क. ५ धांडा–जवारीचें हिरवें झाड. कानोसा–कान देऊन ऐकणें.

३२ **शिवाजी आणि चिपळूणकर** ( मलकापूर ता. १३ नोव्हें. १९२९ ) चिपळूणकरांच्या I am the Shivaji of Marathi language या उक्तीचें समर्थन व स्पष्टीकरण वरील कवितेंत करण्याचा प्रयत्न केला आहे.

३३ **आई !** ( श्रीक्षेत्र कोटेश्वर. नरवेल ता. २९ मे १९२९ )

३४ **माझी ताई** ( नरवेल ता. ३१ मे १९३० ) धाकटी बहीण शांता, तिला उद्देशून.

३५ **जुन्या गृहास !** ( नरवेल ता. १ जून १९३० ) मलकापूर येथील आमचा राहण्याचा वाडा, घरांच्या वाटणीच्या वेळेस, काकांच्या वाट्याला गेला, तेव्हां तें घर सोडण्याच्या प्रंसगीं अंतःकरणांत उचंबळलेल्या भावनांवर या कवितेची उभारणी झाली आहे.

३६ **हें सुख०** ( नरवेल ता. ८ सप्टें. १९३० )

क. ४ रामपहार–दिवस उजाडायच्या अगोदरची वेळ.

३७ **अनुत्साह** ( लॉ कॉलेज नागपूर. लेखन काल अनिश्चित )

३८ **तुझ्या शोधांत** ( अमरावती ता. १६ ऑगष्ट १९३२ )

क. २ ओ. ९ चाहाळ—चाहूल

" ७ " १ कोनोकोनीं—प्रत्येक कोपऱ्यांत

३९ **संगमावरील सायंकाळ** ( धंतोली नागपूर ऑगष्ट १९२९

पहिल्या कवितेंत उल्लेखिलेल्या संकल्पित खंडकाव्यांतील दुसरा एक उतारा

क. १ ओं. ११ गुलाबी कोर्डे--पहा कै. गडकऱ्यांची या मथळ्याची कविता

क. ७ ओ. ८ प्रो. वा. म. जोश्यांच्या 'रागिणीं' तील.

" " ९ कै. गडकऱ्यांच्या ' भावबंधनांतील.

" " १० हंसनंदना—महाश्वेता. बाणभट्ट.

४० **आमची शांता** ( धंतोली नागपूर, १८ ऑ. ३० ) ही कविता कालानुक्रमानें छापावयाची चुकीनें राहून गेली ह्मणून इथें छापली आहे. 'तूं माझा यजमान' ही चाल

४१ **लव्हाळीं** ( नागपूर ता. २१ एप्रिल १९३३)